रा. रा. श्रीपाद कृष्ण कोल्हटकर, बी. ए., एल्एल्. बी.,
यांच्या चार नाटकांतील अर्थ व टीकेसहित

# सुंदर उतारे




रामराव गणेश गडकरी
यांनीं काढिले,
ते 'मनोहर' छापखान्यांत छापून
शंकर बापूजी मुजूमदार यांनीं
किर्लोस्कर संगीत मंडळीकरिता
पुणें येथें प्रसिद्ध केले.

१९०७.

किंमत चार आण.

# प्रस्तावना.

सदर्हू पुस्तकास मोठ्या प्रस्तावनेची अवश्यकता दिसत नाहीं. त्याच्या नांवावरूनच त्याचा उद्देश स्पष्ट होत आहे. रा. कोल्हटकरांच्या कृतीला जसे कांहीं विरुद्ध टीकाकार आहेत, तसेच त्यांची कृति आवडणारे त्यांचे भक्तही आहेत; व हे उभयतां आपआपलीं कामें मनोभावें करीत आहेत ही यांत विशेष आनंदाची गोष्ट आहे. मराठी भाषेंतील कोणत्याही नाटकावर अशा प्रकारचें वाग्युद्ध माजलेलें आजपर्यंत पाहण्यांत नाहीं. रा. कोल्हटकरांचीं नाटकें किर्लोस्कर मंडळी करूं लागल्यापासून तिला अनुयायी मिळून त्यांच्या-कडूनही तीं नाटकें रंगभूमीवर येऊं लागलीं आहेत. संगीत मंडळ्यांपैकीं फार तर एक दोनच मंडळयांनीं अद्याप कोल्हटकरांचीं नाटकें केलीं नसतील. या-वरूनच किर्लोस्कर मंडळी जी नाटकांची निवड करते ती त्यांच्या नाटकांत कांहा विशेष असतें ह्मणून करते हें उघड ठरत आहे. ज्याला जें प्रिय तें तो घेतो, हा साधारण नियम आहे. ह्याला अनुसरून कोणी कोल्हटकरांचे दोषच काढीत बसल्यास त्याला तो मार्ग मोकळाच आहे. आह्मांला कोल्हटकरांचे नुसते गुणच पहावयाचे आहेत व आमच्या दृष्टीनें जेथें ते दिसतात तेथें ते आह्मी ग्रहण करीत आहों. याच उद्देशानें पुणें येथें नुकत्याच होऊन गेले-ल्या भारत नाट्यसमाजाच्या तिसऱ्या संमेलनाच्या वेळीं किर्लोस्कर मंडळीनें कोल्हटकरांच्या चारी नाटकांतील वेंचे काढणारास बक्षीस ठेवलें होतें. त्या वेळीं आलेल्या निबंधांत रा. रामराव गणेश गडकरी यांचा निबंध परीक्षकांस पसंत पडला. तो आज पुस्तकरूपानें प्रसिद्ध होत आहे. परीक्षेकरितां आलेल्या निबंधांपैकीं रा. रामचंद्र बळवंत वैद्य, पुणें, यांचाही निबंध बऱ्यांपकीं होता; परंतु तो अपुरा असल्यानें परीक्षकांनीं एकच निबंध पसंत केला. प्रस्तुत पुस्तकास सहृदय वाचक मिळतील, तर काव्य व सुभाषित यांपासून होणारा आनंद याही पुस्तकापासून झाल्याशिवाय राहणार नाहीं अशी आशा आहे.

प्रकाशक.

श्रीशं वंदे ।

## रा. रा. श्रीपाद कृष्ण कोल्हटकर यांनीं रचिलेल्या चार नाटकांतील

# सुंदर उतारे.



ज्या अनुक्रमानें हीं नाटकें रंगभूमीवर आलीं त्याच अनुक्रमानें त्यांतील उतारे घेऊं झटल्यास संगीत वीरतनयापासून सुरवात करावयास पाहिजे. आतां हे उतारे नीटपणें समजावयास संदर्भ व तदनुरोधानें कथाभाग अवश्य माहित असले पाहिजेत; निदान अशा प्रकारचे उतारे काढणारानें तरी आपल्या वाचकांनीं तीं नाटकें वाचिलीं नाहींत असा आपला समज करून घेऊन संक्षेपतः त्या नाटकांचे कथाभाग सांगितले पाहिजेत. परंतु स्थलसंकोचास्तव प्रस्तुत लेखकाला आपला उलट समज करून घ्यावा लागून कथानककथनाला फांटा देणें भाग पडलें आहे. पुस्तकरूपानें किंवा प्रयोगरूपानें रा. कोल्हटकरांच्या चारी नाटकांपैकीं प्रत्येक नाटक या निबंधाच्या वाचकाच्या नजरेखालून एकदां तरी गेलें आहे, अशा साधारण धृष्ट परंतु शक्य समजानेंच प्रकृत उतारे देणारानें पुढील वळण स्वीकारिलें आहे.

## वीरतनय.

शून्य सखिविरहित रम्य उटज भासे । शून्य आकाशहि मेघसंनिवासें । धूलिपूरित शून्या रसाहि सारी ॥ होत हृदया सुख खेदयुक्त भारी ॥ १ ॥

नाटकांतील विधुर नायक शूरसेन यानें आपल्या मृतप्रियेच्या पित्याच्या आश्रमाजवळील, ज्या ठिकाणी त्या उभयतांनीं अनेक सुखाचे दिवस काढिले तें स्थान पाहून त्याच्या निसर्गजन्य रमणीयतेमुळें हर्षित होऊन वरील उद्गार काढिले आहेत. तो ह्मणतो:––हा आश्रम यद्यपि रम्य आहे तथापि माझी प्रिया नसल्यामुळें मला अगदीं शून्य भासतो; त्याच कारणामुळें आकाशही मेघांनीं व्याप्त असूनही शून्य वाटतें; धुळीनें भरलेला असा हा सृष्टिप्रदेशही शून्यच भासतो. त्यामुळें हृदयाला फारच सुख वाटतें; परंतु तें कसें सुख? तर प्रिया नसल्याकारणानें खेदमिश्रित! यांतील शब्दांचा परस्परविरोध लक्ष्यांत ठेवण्यासारखा आहे.

शूरसेनाच्या साह्यानें काळस्वरूपी वाघाच्या हातून सुटल्यानंतर पुरुषवेषांत असलेली शालिनी शूरसेनास ह्मणते:––

जाहले आभार भारी आपुले ॥ कालहरतांतूनि मातें रक्षिलें ॥
धन्य माता-पितर साचे धन्य जे । पुत्ररत्ना शूर ऐशा
प्रसवले ॥ १ ॥ धन्य कांता श्रांत कांतासी अशा । तोषवी
आलिंगनें जी कोमलें ॥ २ ॥

या पद्यांतील शेवटल्या दोन ओळींत जी स्त्री अशा कांतास आपल्या आलिंगनानें तोष देते तिला शालिनीनें धन्य ह्मटलें आहे. यावरून तिचा नैसर्गिक स्त्रीस्वभाव कृत्रिम पुरुषवेषाला न जुमानतां किती स्फुटत्वानें बाहेर आला आहे! शालिनीच्या ऐवजीं जर एकादा खरोखरच पुरुष तेथें असता तर त्याच्या तोंडून असे अस्वाभाविक उद्गार कधींही आले नसते; परंतु शालिनी स्त्रीच असल्यामुळें तिनें असें ह्मणणें किती स्वाभाविक आहे!

वृष्टिमुळें तूं मम नयनांसी ॥ भीतिव्याकुल अजुनी दिससी ॥
स्वेदबिंदु ते नष्ट होउनी ॥ शोभविती जलकण वदनासी ॥१॥

अतिशीतानें पीडित होउनि । रोमांचातें धारण करिसी ॥२॥
कपोलही आपांडु होउनी ॥ कंप सुटे सुंदर गात्रांसी ॥

पावसाच्या सरीनें जो परिणाम शालीनावर झाला आहे तो वाघाच्या भीतीमुळें झाला आहे असें शूरसेन प्रतिपादन करितो. तो ह्मणतोः—या होत असलेल्या वृष्टीमुळें तूं ( त्या मृत झालेल्या वाघाच्या ) भयानेंच अजून व्याकुळ आहेस असें वाटतें. ( भयामुळें तोंडावर येणारे ) घर्मबिंदु जरी नाहींसे झाले आहेत तरी तुझ्या तोंडावर पडलेल्या या पावसाच्या थेंबांनीं त्यांची उणीव भरून काढली आहे. अतिशय गार वाऱ्यानें व थंडीनें तुझ्या अंगावर रोमांच उभे राहिले आहेत व तुझीं सुंदर गात्रें थरथर कांपत आहेत तीं भीतीमुळेंच असा भास होतो. एकाद्या गोष्टीचीं खरीं कारणें बाजूला ठेवून काल्पनिक कारणें पुढें करण्याची शक्ति या पद्यांत दिसून येते.

त्या भयंकर वृष्टिकाळीं आकाशांत इतस्ततः फिरणाऱ्या ढगांचें वर्णन शूरसेन कसें करितो पहा! तो ह्मणतोः—हा पहा ढगांचा समुदाय

श्याम कवचावरी घालुनियां गंभीर करित रव तुंबळ रणा करी ।
चपला खड्गीं भेदुनियां घनरिपु पाडी सलिलरुधिर महीवरी ॥

अर्थः—हा ढगांचा समुदाय आपल्या अंगावर काळ्या रंगाचीं चिलखतें घालून गंभीर वीरघोष करीत तुंबळ युद्ध करित आहे व आपल्या वीजरूपी तलवारीनें इतर मेघरूपी शत्रूंना जखमी करून त्यांच्या शरीरांतून जलरूपी रक्त भूमीवर पाडित आहे.

रणशूर शूरसेनाच्या तोंडीं हें वीरोचित रूपक किती समर्पक झालें आहे! मनुष्याला आपल्या रोजच्या व्यवसायांतील उपमा व उदाहरणें सांपडायचीं, या सिद्धांताला वरील पद किती अनुसरून आहे!

कारागृहांत सांपडलेल्या शूरसेनास मुक्त करण्यासाठीं निघते वेळीं बकुलानें देवास प्रार्थिलें आहे :—

शरणागत नाथ जना तुझ्याविना समयिं या विनवूं कुणा ॥
मद्‌भुजबंधनिं पडती तोंवरि तातांच्या करुनी अवना ।
शिथिल सुसह करिं करीं कुसुमापरि बंधना ॥

ह्मणजे तो ह्मणतो—हे शरणागतरक्षका परमेश्वरा, या वेळीं तुझ्याशिवाय दुसऱ्या कोणाची प्रार्थना करूं ? देवा, आलिंगनासाठीं पसरलेल्या माझ्या हस्तांच्या बंधनांत सांपडेपर्यंत माझ्या तातांची तीं कारागृहांतलीं बंधनें फुलांपेक्षांही सुकुमार कर.

यांत बंधनाचे दोन प्रकार दाखविले आहेत व एकांतून शूरसेनाची सुटका झाली कीं, तो दुसऱ्यांत सांपडणार, असेंही ह्मटलें आहे. परंतु या दोन बंधनांत केवढा विरोध आहे ! एक बंधन ह्मणजे शत्रुपक्षानें हातापायांत अटकविलेली कठिण शृंखला व दुसरें एकुलत्या एक पुत्राच्या सुकुमार हातांचें परिवेष्टन !

वीरसेनाच्या सैन्यानें प्रकोपाच्या नगरावर हल्ला केला तर आपल्याला कारागृहांतच मरण येणार हें कळल्यामुळें शूरसेनाला वाईट वाटून तो ह्मणतोः—

किति ही नीच दशा मातें आली । अवचित या काळीं । हे
भगवंता मजवरि आतां अनुकंपा तव काय निमाली ॥ कर
स्फुरती आयुध धरण्यातें । नच परि जवळी तें ॥ मन हें
उत्सुक बहु सुत बघण्यातें ॥ परि नच तो येथें ॥ प्रियसुत-
विरहित निःशस्त्र अहा मरणें लिहिलें माझ्या भाळीं ॥

अर्थ उघड आहे. या पद्यांत शूरसेनाची दीन स्थिति किती सुरेख रीतीनें उघड केली आहे.

वर सांगितल्याप्रमाणें अगदीं निकृष्ट अवस्था झाली असतांही आपल्यासाठीं वीरसेनानें शत्रूच्या अटी मान्य कराव्या अशी त्याची मुळींच इच्छा नाहीं. त्याची स्वदेशभक्ति उलट त्याला असें ह्मणावयाला लावते कीं:—

मरण गणुनि दूषवीं स्वदेशकीर्ति मी यदा। रौरवनरकीं पडोंच रौरव नरकीं पडों झडों कृतघ्न मी सदा ॥ तनय नको कीर्ति नको सौख्य नको संपदा। शतपट अति विकट निकट प्रकट होउ आपदा ॥

या एकाच पद्यांत शूरसेनाची स्वदेशप्रीति कवीनें किती उज्ज्वलरीतीनें प्रकट केली आहे!

तो इतकें ह्मणतो तोंच शुंभसेन येऊन त्याला शरण येण्याविषयीं उपदेश करितो; त्याला शूरसेन ह्मणतोः—

मन्मुख सन्मुख रणिं झणिं कंप सुटत ज्या पदा ॥ त्याच पदीं तेंच वदन नच नमविन मी कदा ॥

ज्या माझ्या मुखाला पाहतांच जे तुझे पाय समरांगणांत लटपटूं लागतात त्याच पायांवर तेंच मुख केवळ प्राणासाठीं लीन करूं काय? छेः! असें कधींही होणार नाहीं.

किती खोंचदार उत्तर हें! शूरसेनाच्या व शुंभसेनाच्या मधील अंतर वरील दोन ओळींत स्पष्ट होत आहे.

आजवरी जनक देइ जन्म सुताला। पुनर्जन्म तनयें मज आजि दीधला ॥ आलिंगूं तनु किति ही धूलिधूसरा। चुंबुं किती म्लान मुखा या मनोहरा ॥ पाहुं किती नेत्र भरुनि मूर्ति सुंदरा। तृप्ति न हो सुमहोत्सव आजि लाधला ॥

रसात्मक या दृष्टीनें या पदाची योग्यता फारच मोठी आहे. शूरसेन ह्मणतोः— आजपर्यंत बाप मुलाला जन्म देत असे; परंतु आज माझ्या पुत्रानें मला पुनर्जन्म दिला. अहाहा! रणांगणांतील धुळीनें (सडकेवरील किंवा शेतांतील नव्हे!) मलिन झालेल्या माझ्या लाडक्याला किती वेळां आलिंगन देऊं? निसर्गतः

मनोहर परंतु समरश्रमामुळें म्लान झालेल्या या मुखाचें किती वेळां चुंबन घेऊं? आणि या मनोहर मूर्तीकडे किती वेळ पहात राहूं ? असें मला झालें आहे. कांहीं झालें तरी तृप्ति कधींच होणार नाहीं. हा मला मोठा उत्सवलाभच झाला आहे. या पदांतील शब्दरचना फारच सुंदर साधली आहे. खरा कवि-प्रभाव ( Poetical flow ) यांत दिसून येत आहे.

जखमी झालेल्या वकुलास झोंप लागावी ह्मणून मातृप्रेमानें शालिनी पुढील गाणें ह्मणतें:—

> नीज सुखें विश्रांतिसि पात्र ही निशा। निद्राकुल जग सगळें शांत दशदिशा। चंद्रबिंब बिंबित कासारिं निर्मलीं ॥ सोडुनि नभ निद्रासुख सेवण्या जलीं। अवतरलें काय गमे शांत भूतलीं। अचलपर्ण वृक्षावलि स्तब्धतावशा ॥

रा. कोल्हटकरांच्या हातून जीं पदें झालीं त्यांत या पदाला फारच वरची जागा मिळाली पाहिजे. वीरतनयांत तर या पदाच्या तोडीचें दुसरें पद नाहींच, परंतु सबंध मराठी भाषेंतही या पदाची बरोबरी करणारीं पदें फार थोडीं आढळून येतील. शब्दसौष्ठव, अर्थगांभीर्य, प्रसाद,कल्पना, प्रासंगिकता वगैरे सर्व गोष्टी यांत मूर्तिमंत दिसून येतात. चालदेखील मोठी अनुरूप पडली आहे. याचा अर्थ असा आहे:—बाळा, आतां सुखानें झोंप घे; विश्रांति घेण्याला ही रात्र फारच योग्य आहे; या वेळीं सर्व जग निद्रेच्या स्वाधीन झालें आहे आणि दशदिशा अगदीं शांत आहेत. निर्मल सरोवराच्या उदकांत प्रतिबिंबित झालेलें चंद्रबिंब पाहून असें वाटतें कीं, चंद्रमादेखील निद्रासुख घेण्यासाठीं आकाश सोडून या शांत भूमितलावर आला आहे. शांततेच्या स्वाधीन झाल्यामुळें या वृक्षांचीं पानेंदेखील अगदीं हलत नाहींत.

आतां एक पद आणखी घेऊन मग वीरतनयाची रजा घेऊं. राजसभेंत वारांगना पुढील पद ह्मणतात:—

या जगीं कवि अरसिक गमती । युवतीविषयीं जड त्याचि मति ।। पक्वबिंबसम चुंबनयोग्यचि अधर विद्रुमें उपमित करिती ॥ गल्ल रुचिर उत्फुल्ल गुलाबी आम्रफलीं नच कधीं तुलिती ॥

अर्थः—या जगांतले सर्व कवि मोठे अरसिक आहेत असें वाटतें; कारण, स्त्रियांविषयीं विचार करितांना त्यांची बुद्धि अगदीं जड होते. पिकलेल्या व लुसलुशीत बिंबफलांची ओंठांना उपमा द्यायची सोडून कठिण अशा पोंवळ्यांशीं त्यांची तुलना कवि करितात. त्या प्रफुल्ल आणि गुलाबी गालांना आम्रफलाची उपमा देत नाहींत.

या पदांत कवीचें कल्पनाचातुर्य उघडपणें दिसून येत आहे. व त्याचप्रमाणें हजारों वर्षें सारख्या उपयोगांत येत गेल्यामुळें नीरस झालेल्या ठराविक उपमा वापरण्याचा तिटकारा व स्वतंत्र विचारांची आवड हींदेखील व्यक्त होतात.

स्थलसंकोचास्तव या नाटकांतील सुंदर उतारे घेण्यांत इतका अनुदारपणा दाखवावा लागत आहे याबद्दल प्रकृत लेखकाला फारच वाईट वाटत आहे. परंतु स्थालीपुलकन्यायानें प्रस्तुत नाटकाची योग्यता कळण्यास इतकीं पदें पुरे आहेत, अशा समजुतीनें नाइलाजास्तव मनाचें समाधान करून घेणें भाग पडतें. या पद्यांच्या सारखींच आणखी किती तरी पदें या नाटकांत सांपडूं शकतील! परंतु तीं सर्व घेऊं ह्मटल्यास आणि त्यांच्या भरतीला गद्यांतील खुब्याही नीटपणें पाहूं ह्मटल्यास एक विस्तृत ग्रंथच लिहावा लागेल. ह्मणून कांहीं उत्तम पदांचा नुसता निर्देश करून व रसिकांस तीं पद्यें लक्षपूर्वक वाचण्याबद्दल शिफारस करून दुसऱ्या नाटकांकडे वळूं. सुखाशा कांहिं मातें; निज अर्भकासी; तुमच्या प्रीतिसी पहा; प्रभो अनाथ पालका; काय ही दशा तनुची; मजला प्रेम खरें; या जगताच्या ठायीं; धरि अवरुनि झडकरी; मम लालसकर्णीं; हें वृत्त

ऐकुनी जाण; तूं अनाथनाथ अशी कीर्ति, हीं पद्यें करुणरसपर; व कुठें पंचानन; दक्ष धुरंधर; जगीं महशूर; हीं वीररसपर म्हणून रसिकांनीं अवश्य वाचून पहावींत. याशिवाय करुं प्रचंड सुमंडपा; सदय हृदय अदय करुनि; मृदु बोल वाक्य; अशीही सुगुणखनि; बेत हाच झाला अंतीं; सुंदरी विलासिनी; तुज पुलशताधिक मानी, हीं पद्येंही सूक्ष्म दृष्टीनें वाचून पाहणारास आनंद दिल्या खेरीज राहणार नाहींत. असो. आतां

# संगीत मूकनायक

या नाटकाकडे वळूं. यांतील उतारे घेण्यापूर्वी सुंदर पद्यांच्या निवडणुकीच्या धोरणासंबंधीं लिहिलें पाहिजे. शब्दसौंदर्य, अर्थगांभीर्य, कल्पनावैचित्र्य, प्रसाद, रसपोष वगैरे अनेक गुणांनीं कविता चांगली ठरत असते. या दृष्टीनें प्रस्तुत उतारे घेण्याचें योजिलें तर मूकनायकांतून निदान साठांपेक्षां अधिक पद्यें घ्यावीं लागतील. परंतु तसें करण्यास येथें अवकाश नाहीं. म्हणून जो गुण रा. कोल्हटकरांच्या कृतींत नेहमीं दिसून येतो, व इतर मराठी कवींमध्यें क्वचित दिसून येतो, तो गुण ज्या पदांमधून दृष्टोत्पत्तीस येतो तींच पदें-त्यांतूनही निवडकच-उताऱ्यादाखल घेण्याचा विचार आहे. तो गुण कोणता तर कल्पनावैचित्र्य. इतरगुणयुक्त पद्यें रा. कोल्हटकर यांच्या कृतींत नाहींत असें नाहीं; परंतु तीं इतर कवींच्या कृतींतूनही सांपडतील. याशिवाय दुसरें असें आहे कीं कल्पनावैचित्र्याखेरीज इतर गुणांनीं युक्त असलेल्या पदांचा शब्दशः अर्थ देऊं लागलें म्हणजे त्यांची अर्धीअधिक शोभा निघून जाते; म्हणजे जवळ जवळ त्यांतलें कवित्व निघून जातें व साध्या भाषेंत तीं नीरस वाटूं लागतात, हा सार्वत्रिक नियम आहे. या दोन कारणांमुळें येथून पुढें केवळ वर सांगितलेल्या विशिष्ट गुणाचीं निदर्शक अशींच पद्यें हिशेबांत घेऊन तदितरांचा शेवटीं नामनिर्देश करणें आम्हांला इष्ट वाटतें.

शिकारीहून परत आलेल्या शरच्चंद्राचे श्रम रोहिणीच्या हंसण्यानें नाहींसें झाल्यावर शरच्चंद्र ह्मणतोः—

किति तरि सखिचें मनोज्ञ हास ॥ श्रमयुत विगलित सुख-
वित मनास खास ॥ दंत बघुनि खर पळे निराशा शोकभूत
परिसुनि रवमंत्रा ॥ कपोलभंगिं विषाद करि आत्मनाश ॥

अर्थः—प्रियेचें हास्य किती मनोहर आहे ! श्रांत झालेल्या मनाला सुख देण्याची त्यांत अपूर्व शक्ति आहे ! हास्यकाळीं सखीचे दांत पाहतांक्षणींच तीक्ष्ण व दुःखदायक निराशा अगदीं नाहींशी होते व शोकरूपी भूत प्रियेच्या हांसण्याच्या वेळच्या मंजुलनादरूपी मंत्रानें भिऊन दूर पळून जातें. त्याचप्रमाणें गालाला खळी पडतांच त्यांत पडून विषादही आपला नाश करून घेतो. यांत प्रियजनाचे हंसण्याचा परिणाम फार खुबीदार रीतीनें स्पष्ट केला आहे.

रोहिणी विक्रांताजवळ सरोजिनीचें रूप वर्णिते:—

ओष्ठ असति कोमल दोन्ही रक्तवर्ण त्यांचे ॥ पुष्प जेविं
मुग्धावस्थेमाजिं गुलाबाचे ॥ राग येइ त्यांचाही परि कैक
वेळ मातें । दंतकुंद झांकिती कीं ते कठिण मानसाचे ॥ सरळ
मार्गिं नासा वाटे बैसली टपोनी ॥ कीं गुलाब कुंदहि काळें
विकसतील साचे ॥

ती ह्मणते:—त्यांचे तांबडेलाल आणि कोमल असे ओंठ पाहिले ह्मणजे या दोन गुलाबाच्या कळ्याच आहेत असा भास होतो; परंतु मला कित्येक वेळां त्या ओंठांचाही राग येतो. कारण, ते निर्दयपणानें मोगऱ्याच्या कळ्यां-सारख्या दांतांना झांकून टाकितात. त्याचप्रमाणें त्यांची सरळ नासिका या गुलाबाच्या व मोगऱ्याच्या कळ्या कधीं तरी उमलतील या आशेनें टपून बसली आहे, असें वाटतें.

किती खुबीदार वर्णन आहे ! एका वस्तूचें वर्णन करित असतांना अप्रस्तुत-

रीत्या दुसऱ्या वर्ण्य वस्तूचें वर्णन करण्याची नवीन पद्धति यांत दिसून येते. ओंठांचें वर्णन केल्यावर त्यांचा राग कां येतो हें सांगतांना दंतवर्णनही केलें आहे. त्याच प्रमाणें या पद्यांतील उपमा व नासिकेच्या स्थितीवरील उत्प्रेक्षा हीं अगदीं नवीन असून मनोहर आहेत.

याहीपेक्षां खुबीदार वर्णन पुढें दिलेलें आहे. सरोजिनी विक्रांताच्या प्रथम दृष्टीस पडली त्या वेळीं तो म्हणतोः--

कपोला कपोलाचि ईच्या सरी । इचे ओष्ठ हे एकमेकांपरी । इच्या दक्षिणाक्षाशीं तुल्याकृति। दिसे वामलोचन असे हा कृती । परी एकटी ही असे नासिका । जगीं नाढळे कुणि इच्यासारखा । असे प्राप्त चांफेकळीच्या सवें। समा ह्मणविणें हें सुखाचें नव्हे ॥ ह्मणोनीच ही श्वास सोडी अशी ॥ दया येत भारी इची मानसीं ॥

साधारणपणें नाकाला चांपेकळीची उपमा देण्यांत येते ही गोष्ट ध्यानांत आणून पुढें तिच्या श्वाच्छोछ्वास सोडण्यावर कवीनें पुढील मजेदार कल्पना लढविली आहे. या पद्याचा अर्थ असा आहे:--इच्या एका गालाला हिच्याच दुसऱ्या गालाची उपमा साजते; (कारण सरोजिनीचें सौंदर्य अद्वितीय असल्यामुळें जगांत त्याला इतरत्र तुलना तर नव्हतीच. ) त्याचप्रमाणें इच्या एका ओंठाची बरोबरी करण्यास दुसरा ओंठ आहे; आणि उजव्या डोळ्याची तुलना करावयास डावा डोळा आहे. ह्मणजे या तीन पदार्थांस बरोबरी करण्यास आपल्या इतक्या योग्यतेचे दुसरे पदार्थ मिळूं शकतात. परंतु विचारी नासिका एकटीच असल्यामुळें तिच्यासारख्या पदार्थाच्या अभावीं तिची तुलना मात्र तिच्यापेक्षां फारच कमी अशा चांपेकळीशीं करण्यांत येते. आपल्यापेक्षां कमी दर्जाच्या पदार्थाशीं बरोबरीचें ह्मणवून घेणें हें सुखाचें नव्हे याच विचारानें ती विचारी नेहमीं सखेद निश्वास सोडिते, असें वाटतें व त्यामुळें विचारीची अगदीं दया येते !

सरोजिनीशीं बोलत असतां विक्रांत ह्मणतो:—स्त्रियांशीं बोलत असतां मोठ-मोठ्या पंडितांची वाचासुद्धां जड होऊन जाते.

भारती जडा सुधीहि मंद्धी बने । बिंबसेवनें । जनीं वदे
असें सुधी मंजुभाषणे ॥ मधुमधुर बिंबसम अधर चुंबिला
नच दंतें । मधुमधूनि रसना अधू सुदति कां अदूरगतिका ही
होते ॥ १ ॥ नवनवल गमे फलकवलविना कशि नीरसता ॥
वद वद मज कारण झडकरि दारुण मोहनिवारण करि आतां ॥

अर्थः—हे मंजुभाषिणि, बिंबफलाच्या ( तोंडल्याच्या ) सेवनानें वाणी जड होते व बुद्धिमानही मंदबुद्धि होतात असें शहाणे लोक ह्मणतात. परंतु, हे सुदति, तुझ्या अतिमधुर अधरबिंबाचें मी आपल्या दंतानें अजून खंडनसुद्धां केलें नाहीं, तोंच मधून मधून ही माझी जिव्हा अधू झाल्यासारखी होऊन जड कां होऊं लागली बरें? फळाचें सेवन केलें नाहीं तोंच त्याचा अनिष्ट परिणाम मात्र मजवर झाला हें मोठें नवल आहे! तरी सुंदरी याचें कारण मला लवकर सांग, आणि माझा मोह दूर कर.

सुंदर स्त्रियांच्या विधानाविरुद्ध पुरुषांला फारसें बोलवत नाहीं; स्त्रियांच्या ओंठाला तोंडल्याची उपमा देतात आणि तोंडलें खाल्ल्यानें जीभ जड होते ही सर्वसाधारण समजूत आहे. या तीन अगदीं भिन्न गोष्टींची कवीनें कल्पकतेनें एकवाक्यता केली आहे. रा. कोल्हटकरांच्या कृतींत जें अलौकिक असतें तें हेंच!

'मदिरा आपणांला माहीत आहे का?' या सरोजिनीच्या प्रश्नाला विक्रांत उत्तर करितो:—

असे कालाचि जी भगिनी । न जाणे कोण या भुवनीं ॥
सुरासुरांच्या भेदाचें जी कारण आदि असे ॥ पंडित मोठे

मूढ करी जी क्षण नच लागतसे ॥ १ ॥ बालपणीं जी वृद्ध करितसे बालिश जरठपणीं ॥ मरणाविण जी पिशाच बनवी दया न मनिं आणी ॥ २ ॥

अर्थः—देवदानवांच्या कलहाचें मूळ कारण, जी मोठमोठ्या पंडितांना एक क्षण न लागतां मूढ बनवितें, जी मनुष्याला बालपणांतच अकालीं वृद्धपणा आणिते आणि म्हातारपणीं पोरकट लीला करायला लाविते, व मरण येण्यापूर्वीच मनुष्याला पिशाच बनवून त्याकडून वेड्यावांकड्या कृती करविते ती प्रत्यक्ष कृतांतांची भगिनी मदिरा कोणाला बरें माहित नसेल ?

या एकाच पद्यांत कवीनें या दुष्ट पदार्थाचें किती यथायोग्य वर्णन केलें आहे ! मदिरा यांत सांगितलेली कोणती गोष्ट करीत नाहीं ?

सरोजिनीनें आपल्या भावाला मदिरेपासून सोडवील त्याशींच मी विवाह करीन असें सांगितल्यावर विक्रांत ह्मणतो:—समजलों या सर्व प्रतिज्ञांच्या मुळाशीं काय असतें तें !

प्रेम नोहे ॥ द्वेष मूळाशीं आहे ॥ दांडगें भ्रूतांडवासम मांडि लीला बघुनि कीं । चंड शंकरचाप रघुकरिं दंडि खंडुनि जानकी ॥ मीन निज बघुनी नयनसमची न धरुनि कुलीनता । दीन जरि अतिहीन करि प्रविलीन द्रुपदसुता स्वतां ॥

अर्थः—या सर्व पणांच्या–प्रतिज्ञांच्या–मुळाशीं प्रेम नसतें तर द्वेष असतें आपल्या भ्रुकुटीशीं बरोबरी करूं पाहणाऱ्या शंकरधनुष्याचे जानकीनें मत्सर वश होऊन रामाकडून तुकडे करविले आणि द्रौपदीनें आपल्या नेत्रांशीं स्प करणाऱ्या मत्स्याचा, आपला मोठेपणा विसरून, अर्जुनाकडून भेद करविल त्याचप्रमाणें तूंही मदिराक्षी असल्यामुळें मदिरेला नाहींसें करण्यास उद्यु व्हावें हें योग्यच आहे.

स्त्रियांच्या भ्रुकुटीला धनुष्याची, डोळयांना मीनाची व मदिरेची उप

देतात; व सीतेचा, द्रौपदीचा व सरोजिनीचा पण यांची कवीनें आपल्या बुद्धिप्र-भावानें संगति करून विक्रांताकडून मोठ्या अकलेचा कोटिक्रम करविला आहे.

प्रतोदाचे नास्तिकपणाचे उद्गार ऐकल्यानंतर विक्रांत म्हणतो कीं कांहीं प्रसं-गांवरून ईश्वराचें अस्तित्व सिद्ध होतें ते प्रसंग कोणते, तर ज्या वेळीं—

जलधर घनतर फिरति गगनभर दाहि दिशा करिती बहु
धूसर कृष्ण भयंकर पडति महीवर ॥ अमरलोकिंचे गूढला-
भपर ह्मणुनि तुंगशिर पुराण तरुवर पडति महीवर दंड
भरिति खर ॥ इतुकें बघुनि श्रवणाक्षि स्थिर राहति तरि त्या
करित सुजर्जर खेचर चपलादीप अचिरकर ॥

अर्थः—ज्या वेळीं दाट कृष्णमेघ आकाशांत चोंहीकडे गर्दी करून दाही दिशा धुंद करितात व थोड्याच वेळानें भयंकर वेगानें पर्जन्यरूपानें जमिनीवर कोसळूं लागतात; ज्या वेळीं जणूंकाय स्वर्गलोकचें गूढ सौख्य पाहण्याकरितां फाजील उंच वाढलेले जुनाट वृक्ष आपल्या या वाजवीपेक्षां ज्यास्त धृष्टपणाबद्दल दंड भोगण्याकरितां कडाडून जमिनीवर पडतात व हें पाहून डोळे व कान जरा स्थिर होतात तों त्यांस आकाशांत फिरणाऱ्या क्षणैक कांतीचा विद्युत् रूपी दीप आपल्या कांतीनें व मेघ आपल्या आरोळ्यांनीं त्रासवून सोडितात, अशा वेळीं नास्तिकाच्या मनांतदेखील परमेश्वर असला पाहिजे असा भाव उत्पन्न होतो.

केवढी विचारशक्ति ही! कल्पनेची किती उंच भरारी ही! उंच वृक्ष पडतात, यावरची उत्प्रेक्षा कशी रम्य आहे! आपल्या योग्यतेपेक्षां अधिक उड्या मारण्याचा यत्न केला असतां तो कसा फसतो, हें वृक्षांच्या उदाहरणावरून सिद्ध करून दाखविलें आहे.

एके ठिकाणीं केयूर प्रतोदास ह्मणतो कीं आतां सायंकाळ झाली आहे आणिः—

विश्वंभर हा खगसंध्या सुमकुंकुम हें कीर्ण करुनि परते जग-

तिचा सूत्रधर सविता॥ विट तस्कर या नटवर्गा तो झडकरि संचारी क्षितिरंगीं आज्ञा री अस्ताचलजवनिकां त.रि.त होत.॥

अर्थः—हा सर्व विश्वाचें भरण करणारा सूर्यरूपी जगताचा सूत्रधार अ... शांत तारकारूपी फुलें आणि संध्याकाळची पश्चिमेकडील रक्तिमा हेंच कुं... उधळून परतूं लागला आहे आणि अस्तपर्वतरूपी पडद्यामागें जातां ज... रात्रीं भटकणाऱ्या विट व चोर या नटांना विश्वरंगभूमीवर आपापल्या भूमि... करण्यासाठीं लवकर पाठवीत आहे.

यांत सूर्यास्ताची व नाटकांतील सूत्रधाराच्या गमनाची साम्यता मोठ्... कुशलतेनें दाखविली आहे. सूर्य हा जगताचा सूत्रधार! नक्षत्रें म्हणजे फु... आणि संध्याराग म्हणजे गुलाल! विटतस्कर हे नट! सृष्टि ही रंगभूमि आ... अस्ताचल हा पडदा! हें परंपरित रूपक कवीच्या कल्पकतेला खरोखर भूषणावह आहे.

प्रतोद केयूराजवळ रात्रीच्या प्रसंगीं भयंकर दिसणाऱ्या स्मशाना... वर्णन करितोः—

दाट अधंकार घोर व्यापुनी असे। जणुं पिशाचसंघ एकव-
टुनि स्थित वसे। कीं चितांमधील धूम्र दाटुनी दिसे।
द्रव्य तम नसेच धीर बोलती कसें। ज्वाला या नाशोनि न
टाकिति काळोखा। घनता परि त्याची दावीती अवलोका।
तम हें आकाशासीं भिडुनी अस्ता कां नेई तारका॥

दाट आणि भयप्रद अंधकार चोहींकडे व्यापून राहिला आहे तो पाहून असा भास होतो कीं सगळीं पिशाचें या ठिकाणीं एकवटलीं आहेत किंवा स्मशानां... तला सगळा धूर एका जागीं गोळा झाला आहे! तर्कशास्त्रांत अंधःकार हा पदार्थ नाहीं असें म्हणण्याचें धाडस कसें करितात हें मोठें नवल आहे! मधून मधून भडकणाऱ्या या ज्वालांनीं अंधकाराचा लोप न होतां उलट तो किती दाट

आहे हें मात्र दिसून येत आहे. अंधार आकाशासीं लगट करून तारकांचा लोपच करून टाकितो कीं काय असें वाटतें.

अंधकारावरील उत्प्रेक्षा नावाजण्याजोग्या आहेत. तर्कशास्त्रांत तम हें वस्तु नसून तेजाचा अभाव ह्मणजे वस्त्वाभाव आहे असें ह्मटलें आहे; परंतु स्मशानांतला दाट अंधकार पाहून प्रतोदासारख्या ठराविक गोष्टींचा तिटकारा करणाऱ्या मनुष्याच्या तोंडून कवीनें वरील विधानाच्या सत्यतेबद्दल जी धीटपणाची शंका वदविली आहे तीदेखील मोठी मनोरम आहे. त्याचप्रमाणें स्मशानांत वारंवार भडकणाऱ्या ज्वालांनीं वास्तविक पहातां अंधःकाराचा नाश व्हावयाचा; परंतु कवीनें ह्मटलें आहे कीं त्या ज्वालांनीं अंधकाराचें स्वरूप विशेष व्यक्त होत आहे. हा विरोधाभास होय. मध्यंतरींच थोडासा उजेड पडून गेल्यानंतर मनुष्याचे डोळे दिपून गेल्यामुळें भोंवतालचा अंधकार पूर्वीपेक्षांही अधिक झालेला दिसतो या सार्वत्रिक अनुभवाच्या आधारानें कवीनें वरील ओळी लिहिल्या आहेत. यावरून त्याची कल्पना दिसून येते.

उद्गत तारकांना पाहून विक्रांत ह्मणतोः—

वळते अंजलि नकळत बघुनि तुह्मांलागीं । तुमचे कालदि-
शायोगकला कीं अंगीं ॥ गतकालीन जसे सादर नरपति
यागी । असतों दृष्टि तुह्मांवरि देउनि हतभागी ॥ समका-
लीन निरीक्षगीं तुमचे अनुरागी । मिळविति दर्शनसुख
भिन्न जरिहि भूभागीं ॥

अर्थः—अहो तारकांनों ! तुम्हाला पाहतांच नमन करावें अशी मनुष्याची त्याला नकळत प्रवृत्ति होते; कारण, तुमच्या अंगीं भिन्न भिन्न काळ आणि भिन्न भिन्न स्थलें यांचा संयोग करण्याची अजब शक्ति आहे. मागील काळचे मुनी ज्याप्रमाणें तुमच्याकडे पाहत होते त्याचप्रमाणें आह्मीही सध्यां तुह्माकडे पाहतों ( याप्रमाणें भूतकाळ आणि वर्तमानकाळ यांतील उभयसाधारण

गोष्टीनें तुह्मी त्या दोघांचा संयोग करितां ) त्याचप्रमाणें प्रस्तुतकाळीं नि-
निराळ्या ठिकाणीं असलेले विरहीजन आपापले प्रणयिजनही याच वेळ
तुमच्यांपैकीं एकाद्या विवक्षित ताऱ्याकडे पहात असतील व आपणही सध्यां
तिकडेच दृष्टि लाविली आहे ह्मणून दोघांचीहीं दृष्टि एक झाली असें समजू
कल्पनेचें दर्शनसुख अनुभवितात. (हे भिन्न भिन्न स्थळें एक करण्याच्या
शक्तीचें उदाहरण.)

या कवीची प्रतिभाशक्ति किती उंच भराऱ्या मारीत असते हें दाखवि-
ण्याला यापेक्षां अधिक योग्य पद त्याच्या चारी नाटकांतून सांपडेल कीं नाहीं
याबद्दल शंकाच आहे. या पद्यांत जी कल्पना आहे ती वाचकांनीं आपल्या
कल्पनेनेंच समजून घेण्याचा यत्न करावा.

चुंबन घेण्यासाठीं जवळ आलेल्या सरोजिनीच्या स्पर्शानें जागा झालेला
विक्रांत तिला ह्मणतोः—हे सुंदरि,

नृप झालों दैवी तरि ही ॥ जागृत होणें नाहीं ॥ या श्वा-
साचें ताडन लाजवि मलयाचलिच्या वाता ॥ कंकणरव हा
बंदिजनांतें स्तुतिपाठातें गातां ॥ प्रेमभरित या नयनयुगाचें
किरणजाल पाहोनी । जनप्रबोधन नित्य कृत्य हें देइल रवि
सोडोनी ॥

राजे महाराजे लोकांना जागे करण्यासाठीं ज्या गोष्टी करण्यांत येतात त्या स
सरोजिनीच्या स्पर्शानें करण्यांत आल्या अशी विक्रांताची कल्पना आहे. या दो
प्रकारांतील साम्य मोठें खुबिदार आहे.

अर्थः—हे सुंदरी, यद्यपि मी राजा झालों तरीही मला इतक्या सुखक
रीतीनें जागें होतां येणार नाहीं. या तुझ्या श्वासाचा वायु पहांटेस वाहणाऱ्या
गार व सुगंधित मलयवाताला निःसंशय लाजवील व तुझ्या कंकणांचा मंजु
नाद स्तुतिपाठ गाणाऱ्या बंदिजनांला खालीं पहावयाला लावील. त्याचप्रमा

तुझ्या प्रेमपूर्ण आणि तेजस्वी नेत्रांना पाहून सूर्य आपलें लोकांना जागें करण्या-चें नित्यकर्म खचित सोडून देईल.

अष्टमीच्या उत्तररात्रीचें निस्तेज चांदणें पाहून उदासीन झालेल्या विक्रांतास सरोजिनी ह्मणते:—भोंवतालीं पाहिलेंत का? आनंदी आनंद चालला आहे !

तरु विधुसी पवनयोगें नमीती फिरूनही ॥ धृ० ॥
चिर निद्रेमधुनि जागी रमणकरें जाहलीं, करि हास्या
यौगकालीं रम्या शोभते मही ॥ १ ॥

अर्थः-वाऱ्याच्या योगानें हे वृक्ष चंद्राला पुनःपुनः नमन करित आहेत. बराच वेळ झोंप घेतल्यानंतर पृथ्वीचा पति चंद्र जागा होऊन त्यानें आपले किरणरूपी हात तिच्या गळ्यांत घातले आहेत आणि पतिस्पर्शामुळें आनंदित झालेली वसुंधरा जणु काय मंदहास्य करित असल्यामुळें फारच शोभत आहे.

किती गोड कल्पना आहे ! अष्टमीचे दिवशीं चंद्रोदय उत्तर-रात्रीच्या सुमा-स होत असल्यामुळें कवीनें तो चिर निद्रेमधून जागा झाला आहे असें ह्मटलें आहे, तें किती यथार्थ आहे !

वकिलाच्या सन्मानार्थ श्रृंगारलेल्या नगरीला पाहून राजा शरच्चंद्र म्हणतोः—

नगरी न खरि नवरि गमत ॥ सार्वभौम नृपसुखार्थ ॥
आभरणीं होइ कांत ॥ धृ० ॥ जलयंत्रीं पूर्ण जलें ॥ दीपो-
त्सवि सकल जळे ॥ मन विरोधिभावनांत ॥ १ ॥

अर्थः—ही नगरी नव्हे तर सार्वभौम राजाच्या सुखासाठीं विविध अलंकारांनीं सजलेली ही नववधूच असें वाटतें. त्याचप्रमाणें ठिकठिकाणीं तुडुंब भरलेलीं हीं कारंजीं व हौद पाहून ही जलमय आहे असें वाटतें, आणि जागोंजागीं लावलेले दिवे पाहून ही जळत आहे असें वाटतें. या प्रमाणें मन अगदीं परस्परविरोधक भावनांत गुंग होतहओ.

एकाच कालीं एकच पदार्थ जलमयही दिसतो व जळत आहे असाही दिसतो हा विरोधाभास वर्णनीय आहे.

आपलें कृत्रिम वृद्धत्व आणि खरें तारुण्य यांबद्दल विक्रांत विचार करितो :—

तरुणभाव नखशिखांत देहिं संचरे ॥ बाह्य वृद्धभाव त्याशि द्रोह आचरे ॥धृ०॥ प्रीतीच्या उसाळिसरसि । कुब्जता लया जाइशि । कात्रिम रोमावलिसी । प्रेमानळ जाळि अशी । भीति नावरे ॥ १ ॥

अर्थ—सर्व अंगांत तरुणभाव भिनून राहिला आहे आणि धारण केलेला वृद्धपणा क्षणोक्षणीं लबाडीनें त्याला बाहेर आणूं पहात आहे. प्रीतीच्या जोराच्या उसळिसरशी धारण केलेला वांकडेपणा नाहींसा होऊन शरीर एकदम ताठ होईल आणि त्या कृत्रिम पांढऱ्या केंसांना प्रेमाग्नि जाळून टाकील अशी क्षणोक्षणीं भीति वाटत आहे.

प्रीतीसारख्या प्रबल मनोविकाराला वृद्धपणानें विकृत झालेलें शरीर कसें अयोग्य असतें हें या पद्यांत मोठ्या मार्मिकपणानें दाखविलें आहे.

या नाटकांतील उरलेल्या निवडक पद्यांचा नामनिर्देश येथें केला नाहीं. कारण, तसें करतांना जवळ जवळ सगळ्याच पद्यांची यादी द्यावी लागेल. हें सबंध नाटक रसिकांनीं लक्षपूर्वक एकदां तरी मुद्दाम वाचून पहावें.

## गुप्तमंजूष.

विलासाच्या वाढदिवसानिमित्त बागेंत जमलेल्या बालिका ईश्वराचें स्तवन करितात कीं:—

जगदीशा तात असासि कलिकाला । तटवासी निराखिसि अखिल शिशूंच्या बालिश लीला ॥ धृ० ॥ राहु करें झांकि

सूर्यनयनाला । विधु तिमिरीं मांडि लपंडावाला । ही पिंगा घालितसे ग्रहमाला । स्वर्गंगातटिं उडु फुगड्या खेळति जणुं बहु बाला ॥१॥ मेघ पहा आक्रमुनी गगनाला । श्रम-मारें सोडिति घर्मजलाला । वायु धरी क्रीडत पांशुल तनुला । चोहींकडे तांडव मांडित दीपवि जगता चपला ॥ २ ॥

अर्थः—हे जगदीशा, तूं या सर्व विश्वाचा तात आहेस, आणि एका बाजूला बसून आपल्या सर्व बालकांच्या लीला पाहत आहेस. त्या लीला कोणत्या, तर राहु आपल्या हातांनीं सूर्याचे डोळे झांकित आहे व चंद्र अंधारांत लपून बसला आहे; ही ग्रहमाला रवीभोंवतीं पिंगा घालित आहे आणि आकाशगंगेच्या कांठीं तारका [ अर्थात् एकमेकांभोंवती फिरणाऱ्या जोडतारा Binary Stars ] फुगड्या घालित आहेत; आकाशांत इतस्ततः धांवल्यामुळें दमून गेलेल्या मेघाच्या अंगांतून पाण्याच्या धारा स्वच्छंदानें इतस्ततः उड्या मारित आहेत, आणि चोहींकडे नाचत नाचत वीज सगळ्या जगाला दिपवून सोडित आहे.

खेळापलीकडे या जगांतील कोणत्याही गोष्टींचें ज्यांना ज्ञान नाहीं अशा लहान मुलांच्या तोंडीं वरील स्तुति किती योग्य आहे ! विश्वांतल्या मोठमोठाल्या घडामोडींना कवीनें निरनिराळ्या खेळांचें स्वरूप दिलें आहे, त्यावरून त्याचें कल्पनाचातुर्य उघड दिसून येत आहे.

मध्यान्हकालीं सूर्याकडे पाहून मेघनाथ ह्मणतोः—

भानु पहा तीव्र करीं । शीर्ष सुसंतप्त करी ॥ धृ० ॥ अंबर हें प्रभुलोचन । रवितारक सदा भ्रमण । घर्माचें आलेकन । करित तयाच्या उदरीं ॥ १ ॥ निज किरणिं दिशा दाही । मृगजलमय करुनीही । मायामय जगती ही । शिकवितसे नीति खरी ॥ २ ॥

तो ह्मणतोः—हा पहा सूर्य आपल्या प्रखर किरणांनीं मस्तक तापवीत आहे. आकाश हें परमेश्वराचें नेत्र आहे आणि सूर्य त्यांतीळ तारक [ बुबुळ ] होय. सूर्य आपल्या किरणांनीं दाही दिशांत मृगजळ पसरून हें सर्व जग मायामय आहे हें तत्त्व शिकवितो.

यांतील रूपक चांगलें साधलें असून सूर्य वर सांगितलेलें तत्त्व शिकवितो ही कल्पनाही चांगली आहे.

मेघनाथाला निजलेला टाकून अज्ञातवासांत निघून जाते वेळीं सौदामिनी भावी पतिविरहानें दुःखित होऊन ह्मणतेः—

हतभागी ठरलें । सगळें सुकृत मम आजि लया गेलें ॥धृ०॥
रामें सीतेप्रति त्यागियलें, दमयंतीसि नलें । परि पतिला त्यजिलें न कुणीं हें घोर कृत्य पहिलें। निःसीमचि चांडाळ व्हावें भालीं हें लिहिलें ॥ १ ॥

ती ह्मणतेः—माझें सर्व पुण्य आज लयाला जाऊन मी पूर्ण हतभागी झालें आहें. मी इतकी चांडाळीण आहें कीं आजपर्यंत कोणत्याही स्त्रीनें न केलेलें घोर कृत्य करण्याचें माझ्या कपाळीं आलें आहे. रामानें सीतेचा आपण होऊन त्याग केला आणि नळराजानें दमयंतीला सोडून दिलें; परंतु कोणत्याही स्त्रीनें पतीला आपण होऊन सोडून दिलें नाहीं; परंतु तें माझ्या कपाळीं आलें आहे.

हें पद रसात्मक या दृष्टीनें चांगलें साधलें असून शिवाय नवीन कल्पनेमुळें हें विशेष सुंदर झालें आहे.

आईच्या विरहानें दुःखित झालेल्या नंदिनीचें विलास सांत्वन करितोः—

मनिं धीर धरीं चतुरे । दुःख वृथा हें सारें ॥ जो नर येई जन्मा संकटशत घेउनि तो ये । आवश्यक ही उपाधि जाणीं तिजविण देह नये ॥ संचित दुःख नदींतुनि एकहि बिंदु जरी गत हो । गतत्व लक्षुनि दुःख उपेक्षुनि साधु मानि लाहो ॥

अर्थ—हे चतुरे, धीर धरून हा प्रसंग कमी दुःखावह केला पाहिजे. हें सारें दुःख व्यर्थ आहे; मनुष्य जन्मास येतो तो हजारों संकटें बरोबर घेऊन येतो; दुःखभार हा इतका आवश्यक आहे कीं, त्यावांचून नरदेहच असूं शकणार नाहीं. ह्मणून जे विचारी पुरुष असतात ते पूर्वसंचित दुःखाच्या नदींतून मुक्त थेंब तरी कमी झाला ह्मणजे गत दुःखाकडे लक्ष्य देऊन तितकेंच आपलें भोक्तृत्व संपलें असें समजून आनंदच मानितात.

किती पोक्त आणि उदात्त विचारसरणी! यद्यपि या तत्त्वज्ञानानें दुःखिताचें दुःख कमी होण्याचा संभव नाहीं, तथापि हे विचार खरोखरीच मोठे भारदस्त आणि गंभीर आहेत.

पुरुषवेष धारण केलेल्या सौदामिनीचें पुत्राप्रमाणें संरक्षण करण्याचें प्रतोपानें अभिवचन दिल्यावर ती ह्मणते:– असें झालें तर:—

निजजनकाहुनि मानिन तुम्हां । परमा दया धरिन हृदयीं॥
तरुच्या सहज फलाहुनि गोडी । कलमी फळ निज अंगीं
जोडी । सत्य करुनि दाविनचि नियमा ॥

अर्थ—असें झालें तर मी आपल्याला माझ्या खऱ्या पित्यापेक्षांही अधिक मानीन आणि झाडाला जें नैसर्गिक फळ येतें त्यापेक्षां कलमी ह्मणजे कृत्रिम उपायांनीं आणलेलें अधिक गोड असते हा नियम माझ्या वर्तनानें खरा करून दाखवीन.

यांतील कल्पना अगदी नवीन असून फारच मनोरम आहे.

आपणाला भेटण्याला मी मोठ्या उत्सुकतेनें धांवत आलों असें नंदिनीनें विलासाला सांगितल्यावर तो ह्मणतो:-जिथें ह्मणून खरें प्रेम असतें तिथें हाच प्रकार दिसून यायचा.

हीच रीति जगिं ये दिसोनि । विरहाकुल भेटती प्रतिदिनीं ।
संधि साधुनी दिवसयामिनी॥ धृ० ॥ तरुच्या स्कंधीं आश्रय

व्याया ॥ वेगें धावति लतिका जाया । उदधिकंठ निजभुजिं
वेढाया । जाति नद्या सोत्कंठ धांवुनी ॥ १ ॥

अर्थः—या जगांत चोहींकडे हीच रीत दिसून येते कीं, प्रणयिजन परस्परांना भेटण्याकरितां सतत यत्न करित असतात. याच नियमाला अनुसरून दिवस आणि रात्र संधि [ पक्षीं-संध्याकाळ ] साधून दररोज एकमेकांस भेटतात, वृक्षांच्या स्कंधदेशीं आश्रय घेण्यासाठीं वेली पुढें सरकतात, आणि समुद्राला आलिंगन देण्यासाठीं नद्या मोठ्या वेगानें धांवत असतात.

यांतील सामान्य सिद्धांत व दृष्टांत प्रशंसनीय असून संधि शब्दावरील श्लेषही लक्षांत ठेवण्याजोगा आहे.

मेघनाथ आपण दरिद्री ह्मणून आपला तिरस्कार करितो हें कळल्यावरून विलास ह्मणतोः—मनुष्य या दृष्टीनें श्रीमंतांत व रंकांत कांहींच अंतर नसतें.

जरि हीनकुळीं जनन तरी मनुज नाहीं का । दुःसाध्य असति
सद्गुण का दीन बालका ॥ धृ० ॥ त्या मांडिवरुनि दूर
करी काय मेदिनी ॥ त्या अंधकारिं ठेवित रवि
कोणत्या दिनीं । त्याठायिं भिन्नभाव पवन धरित का मनीं ।
निज करुण किरण त्यावरि पसरिति न तारका ॥ १ ॥

अर्थ—अगदीं उघड आहे. या पद्यांत दृष्टांत, कल्पना, शब्दसौष्टव हीं सं[...] असून शिवाय या कवीच्या कवितेंत बहुतेक दुर्मिळ जो साधेपणा तोही दिसून येत आहे.

पुढें याच गोष्टीविषयीं तो ह्मणतोः—

मनुजांत मात्र अन्याय असे । श्रीमंत रंक यापरि परिसें ।
जड सृष्टिमध्यें मुळिं भेद नसे । दिनमणिवरि पंकज प्रेम करी ।
कुरवाळुनि तन्मुख वितत करीं । स्वप्रेमा दिनमणि दावितसे ॥

धन केवळ जीजवळि सिकता । विमलांतर ऐशी ती सरिता ।
रत्नाकरमुखिं मुख घालितसे ॥

अर्थः—मनुष्यकोटींत मात्र हा श्रीमंत आणि हा रंक या प्रकारचा अन्याय दिसून येतो; जडसृष्टीमध्यें हा भेद मुळींच उरत नाहीं. दिनमणि जो सूर्य त्या-वर पंकज ह्मणजे केवळ चिखलापासून उत्पन्न होणारें कमळ प्रेम करितें आणि सूर्यही कमळाच्या जन्माचा कमीपणा मनांत न धरितां आपल्या किरणरूपी हातांनीं कुरवाळून त्याचें मुख प्रफुल्लित करितो व आपलें प्रेम व्यक्त करितो. त्याचप्रमाणें रत्नाकर ह्मणजे रत्नांचा ठेवा असा जो समुद्र तोही जिच्याजवळ केवळ रेतीखेरीज कांहीं नसतें परंतु जी विमलांतर ह्मणजे शुद्ध अंतःकरणाची (पक्षी स्वच्छ अंतर्भागाची ) असते अशा नदीचें मोठ्या प्रेमानें चुंबन घेत असतो. यांत कवीनें आपल्या विधानाला समर्पक दृष्टांतांनीं बळकटी आणिली आहे. शिवाय यांत शब्दही मोठे योग्य पडले आहेत. सूर्याची योग्यता दाखविण्या-साठीं योजिलेला शब्द दिनमणि आणि कमळाचें हीन कुळ व्यक्त होण्यासाठा वापरलेला ‘ पंकज ’ हा शब्द; त्याचप्रमाणें नदीचें दारिद्य दाखवून समुद्राची श्रीमंती दाखविण्यासाठीं वापरलेला रत्नाकर हा शब्द, हे मोठ्या कुशलतेनें वापरले गेले आहेत. यावरून कवीचें प्रयोजकत्व स्पष्टपणें दिसून येतें. विमलां-तर हा श्लेषही बरा साधला आहे.

मेघनाथानें आपला तिरस्कार केल्यानंतर विलास नंदिनीस ह्मणतो कीं— ‘ तुझ्या प्रेमापुढें माझा उद्वेग टिकला तरी कसा कोण जाणें ! सध्यां ह्मण-शील तर तुझ्या पित्याची क्रुद्ध मुद्रा समोर येण्याला किंवा कठोर शब्द ऐकूं येण्याला अवसरच नाही. प्रिये—

प्रणयतरंगासवें । विवश वाहतों जवें ॥ जलरवें नैकवे गति-
मुळें न पाहवे ॥ धृ० ॥ योगवलें जणुं यति । बाह्य उपाधीं-
मती । प्रणयिजन निवारिति । खेद मुळिं न त्यां शिवे ॥ १ ॥

अर्थः--प्रीतीच्या प्रवाहांत वाहत असलेल्या मनुष्याला त्यांतील प्रेमजला-च्या खळखळाटानें कांहीं ऐकूं येत नाहीं आणि त्या प्रवाहांत जोरानें वाहून जात असल्यामुळें कांहीं दिसतही नाहीं. योगी योगसाधनांनीं बाह्य दुःखांना नाहींसे करितात त्याचप्रमाणें प्रणयिजन प्रेमबलानें सर्व दुःखांचा लय करितात व ह्मणून त्यांना खेद कधीं शिवत नाहीं.

या बारीकशा पद्यांत किती अर्थ भरला आहे! प्रणयतरंगावरील रूपक अतिशय मजेदार झालें आहे. प्रेमाधीन मनुष्यें कोणाच्या बोलण्याकडे लक्ष्य देत नाहींत व भोंवतालीं काय चाललें आहे हें न पाहतां आपल्या नादांतच गुंग असतात याबद्दल कारण या पद्यांत वरील रूपकामुळें सांपडूं शकेल. या-शिवाय येथें एक विशेष गोष्ट अशी आहे कीं पदाची चाल अर्थाला अगदीं अनुरूप आहे. ह्मणजे तीही प्रणयतरंगाप्रमाणें आंदोलनपर आहे. ध्वनि आणि अर्थ एकमेकांस अनुसरणारीं असें क्वचित् आढळतें. महाकवि भवभूति, मोरो-पंत, पोप व टेनिसन् यांच्या काव्यांतून हा प्रकार नेहमीं पाहण्यांत येतो.

नंदिनीच्या स्वभावांतील उदारवृत्ति पाहून विलास तिला तिच्या बापाच्या अनुदारतेबद्दल ह्मणतो कीं:—तुझा उदारपणा पाहून तुझ्या बापाचा अनुदा-रपणा मी विसरून गेलों.

मज नच गमे तिळहि नवल यांत। हेंचि दिसुनि येई जगांत ॥ ध्रु० ॥ उगम संकुचित महानदीचा ॥ तेंवि तव जनकवृत्ति संकुचित ॥ १ ॥

तो ह्मणतो तुझ्या बापाची मनोवृत्ति संकोचित आणि तुझी मनोवृत्ति अत्यंत उदार असावी यांत मला फारसें नवल वाटत नाहीं. कारण अशींच उदाहरणें जगांत नेहमीं हेंच दिसून येतात. व महानदीचा उगम अत्यंतच संकुचित असतो. छोटेसें आहे तरी वरील पद्याला एका समर्पक दृष्टांत मुळें शोभा आली आहे. नंदिनीकडील वृत्तांत घेऊन येणाऱ्या चंचकाला विलास ह्मणतोः—

धन्य खरा तूं वाटसि आतां मद्रमणीच्या शुभ दर्शनें । पाहूं
दे तुज या नयनांना फेडि तयांचें पारणें ॥ धृ० ॥ स्फटिक-
गृहिं जणूं स्थापिलि नयनीं मूर्ति तिची पाहूं दे । पुनीत तीच्या
श्वासामोदें तनुतें भेटवि खेद ने ॥ १ ॥

अर्थः—माझ्या प्रियेच्या मंगल दर्शनानें तूं खरोखर धन्य झाला आहेस असें मला वाटतें; ह्मणून मला आतां तूं आपल्या दर्शनानें पावन कर. स्फटिक-गृहासारख्या स्वच्छ अशा तुझ्या डोळ्यांत स्थापन झालेली तिची मूर्ति मला पाहूं दे, आणि तिच्या श्वासाच्या सुवासानें पवित्र झालेल्या तुझ्या देहानें मला कडकडून भेटून माझा खेद नाहींसा करून टाक.

यांत विलासाची आपल्या प्रिय रमणीविषयीं पूज्यबुद्धि व्यक्तपणें दिसून येते. तद्वत् स्फटिकासारख्या नेत्रांत स्थापन झालेली तिची मूर्ति पाहण्याची कल्पनाही सुरेख आहे.

आपल्या वियोगानें झुरणीस लागलेल्या मेघनाथाला औषध देण्यासाठीं सिद्ध झाली असतां आपली जी स्थिति झाली तिचें सौदामिनी वर्णन करतेः—

औषध वदनीं घालायासि पुढें सरसावें मी । ओष्ठ शिरूं तों
वघती माझे हे चुंबनकामी ॥ नाडि परीक्षाया जो स्पर्शीं तों
मम मंद पडे । कर हालेना रोमांचित हा बद्ध जणूं निगडें ॥
कंट वघाया पुढति करीं जों या भुजसर्पाला । वेढूं पाहे
तनुचंदन हा करि न विलंबाला ॥ वैद्य ह्मणुनि मी येथें आलें
परि झालें रोगी ॥ रोगांचें जें कारण तेंची उपाय या अंगीं ॥ १ ॥

अर्थः—नाथांच्या तोंडांत औषध घालण्याला मी पुढें सरसावतें तोंच चुंबनाविषयीं अधीर झालेले हे माझे ओंठ त्यांच्या ओठांशीं मिळूं पहातात.

त्यांची नाडी पाहण्यासाठीं त्यांचा हात माझ्या हातांत घेतांच माझी नाडी अगदीं मंद पडते आणि माझा हात शृंखलेनें बांधल्यासारखा जागच्याजागींच राहतो. त्यांचा कंठ पाहण्यासाठीं हात पुढें करतांच त्यांच्या देहरूपी चंदनवृक्षाला विळखा घालण्यासाठीं माझा भुजसर्प उत्कंठित होतो. याप्रमाणें मी वैद्य म्हणून येथें आलें खरी, परंतु मीच रोगी झालें. कारण, हा माझा रोग उत्पन्न करण्याचें कारण नाथांच्या अंगीं आहे.

यांत सौदामिनीची अवस्था मोठ्या कुशलतेनें वर्णिली आहे. शिवाय शरीर व भुज यांवर एक रूपकही आहेच. या पद्यांत रसपोष असून साधेपणाही आला आहे.

असो आतां बाकीच्या पद्यांपैकीं कांहींचा नामनिर्देश करून हें नाटक बाजूला ठेऊं. रुदन हेंचि आयुध; मी कलंक कुलजवधू; जरी पीडा शरीरासी; सतत वनां मृगयेंतची; मधुर वचनाचा; न्यून काढण्या भरूनी; मधुकरी; नमन मम तुज असो; हे काला अगम्य; न धरि मनिं; पाहुनि घेईन एकवार ती; पंजर झाला अस्थींचा; अंतर रोगा दूर कराया; ईश्वर पंकज जेवीं मतंगज; प्रीति ही मुळाशीं साधी; जनका वधुनि; जडशिला बनुं कां—हीं पद्यें उत्तमांपैकीं आहेत. शिवाय या नाटकाचें गद्य अतिशय मनोरम आहे. त्याकडे व त्याचप्रमाणें यांतील पात्रांच्या स्वस्वभावानुरूप भाषणाकडे फार लक्ष देऊन हें नाटक वाचल्यास श्रमाचा मोबदला वाजवीपेक्षां ज्यास्त मिळाल्यावांचून राहणार नाहीं. कथानक रचण्याचें चातुर्यही या नाटकांत व्यक्त होतें. पुष्कळांस अशक्य वाटणारें सौदामिनीचें स्वप्न कैलासनाथाच्या " हें स्वप्न बहुतकरून या दोघांच्या वादांतील मुख्य शब्द हिच्या मनावर उमटून त्यांनींच गुंफलें गेलें असावें. " या वाक्याकडे लक्ष्य देऊन पाहिलें असतां तें पडणें अगदीं साहजिक आहे असें वाटूं लागतें. स्वप्नांतील देवीचे शब्द, स्वप्नाचें स्थल व काल, आणि स्वप्नांतील मनुष्यें यांची आणि विद्येच्या वादाच्या वेळच्या प्रवेशांतील शब्द, स्थल व काल आणि यांची परस्परांशीं वाचकांनीं सूक्ष्मदृष्ट्या जरूर तुलना करून पहावी.

# मतिविकार.

ज्या मनुष्याला आपलें सर्व प्रेम एकाच मनुष्यांवर ठेवावें लागतें तो इतरांपेक्षां हतभागी नसतो हें ठरवितांना चकोर ह्मणतोः—

जगिं परिमित आप्तवृंद ज्या । वदति दीन त्या ॥ धृ० ॥
केंद्रीकृत परी प्रेम । लाधे त्यातें निरुपम ॥ १ ॥ प्रेमोद्भव
सुखहि त्यास । इतरांहुनि अधिक खास ॥ २ ॥

याचा अर्थ असाः—या जगांत ज्याला आप्तइष्ट, ह्मणजे प्रेमाचे विषय अगदीं थोडे असतात त्याला लोक साधारणपणें दीन ह्मणतात; परंतु तें बरोबर नाहीं. कारण, त्याला आपलें सर्व प्रेम एकाच केंद्रांत स्थित झालेलें मिळून एकीभूतत्वानें तें अधिकही वाटतें, आणि या सर्व प्रेमाचा विषय एकच असल्यामुळें एकाच वेळीं त्याला त्या सर्वांपासून उत्पन्न होणाऱ्या सुखाचा अनुभव घ्यायला सांपडतो, व त्यामुळें तो इतरांपेक्षां अधिक भाग्यवान् असतो असेंच ह्मटलें पाहिजे.

या नाटकांतील चांगलीं पद्यें बहुतकरून नवीन अशा तात्त्विक विचारांनीं परिप्लुत आहे. त्या दृष्टीनें पाहिलें ह्मणजे या पद्यांतील विचारसरणी वाखाणण्याजोगी आहे.

वृद्ध आनंदरावांनीं सरस्वतीसारख्या अल्पवयस्क बालिकेशीं विवाह केला त्यासंबंधीं मनोहर ह्मणतोः—

विजवर जरि परिणी नव कन्या । उचित न करणी गमत
अनुदिनीं निंद्य जना ॥ धृ० ॥ कलिका जीर्ण पल्लवापाशीं ।
रम्य हर्म्यें नव जीर्ण गृहाशीं । नव नवरी प्रौढवरासरशी ।
बघवेना ॥ १ ॥

बिजवर जर अल्पवयस्क तरुणीशीं विवाह करील तर तें करणें उचित होणार नाहीं, आणि त्याबद्दल लोकांत त्याची नेहमीं निंदा होते; पिकलेल्या पानाशीं नवीन उमलणारी कळी, किंवा जुनाट घराजवळ नवी हवेली जशी कोणालाही पहावत नाहींत, त्याचप्रमाणें म्हाताऱ्या नवऱ्याजवळ नववधूदेखील पाहवत नाहीं.

यांतील दृष्टांत अगदीं नवीन असून फार समर्पक आहेत.

आपली सावत्रआई आणि आपण वयानें जरी सारख्याच आहों तरी स्थान-माहात्म्यामुळें तिची योग्यता फार मोठी आहे हें हंसिकेला सांगतांना चंद्रिका म्हणतेः—

स्थानें एका वस्तुसि ये भिन्ना महती । नियम असा हा
अप्रतिहत दिसतो जगतीं ॥ घनजल वर्षे हिमनग-
तळिं पंकचि होतें । परि तें शिखरीं होई हिम मनोज्ञ-
कांति ॥ १ ॥ विजनीं विपिनीं सुंदरशीं कुसुमें फुलतीं ।
काळें सगळीं कोमेजुनि विगलित होतीं । उपवनिं सुमनें
लतिकावलि परि जी प्रसवे । सुरमूर्तीच्या शिरिं भक्तार्पित
तीं वसती ॥ २ ॥

एका स्थळाच्या योगानें वस्तूला निराळी योग्यता प्राप्त होते असा या जगांत कधीं न मोडणारा नियम आहे. आकाशांतून येणारें पावसाचें पाणी हिमालयाच्या पायथ्याशीं पडलें तर त्याचा चिखल होतो. परंतु तेंच त्या पर्वताच्या माथ्यावर पडलें तर त्याचें सुंदराकृति बर्फ होतें. त्याचप्रमाणें निर्जन अरण्यांत विकसणारीं सुंदर फुलें कांहीं काळानें जागच्याजागींच कोमेजून जातात, परंतु तींच एकाद्या बागेंत विकसलीं तर भक्तजनांकडून देवांच्या मस्तकीं ठेवण्यांत येतात.

या पद्यांतील सिद्धांत यद्यपि जुनाच आहे तथापि त्याच्या समर्थनार्थ दिलेले

दृष्टांत अगदीं नवीन आहेत. त्यांतल्या त्यांत पाण्याचा जो दृष्टांत आहे तो तर फारच आनंददायक आहे. अशा प्रकारच्या नवीन कल्पना शोधून काढण्यांत प्रस्तुत कवीचा हातखंडा आहे, असें जें मागें झटलें आहे, त्याला हें उदाहरण किती पुष्टिकारक आहे !

पर्जन्याची वृष्टि होत असलेली पाहून मननशील मनोहर सरस्वतीस ह्मणतो—

मनुजीं या समयीं सारि अहंता लोपे । लघुता थोर चमत्कारिं भरे ती कंपें ॥ धृ० ॥ हा झंझावात गमे श्वास असे ईशाचा । अवनि व्योमासह यद्गतिनें थरकांपे ॥१॥ नास्तिक नर कितिहि असो चपलेपुढती रसना । विरमे क्षणिं त्यांची जल्पना घनाळापें ॥ २ ॥

भावार्थः—पाऊस पडतो त्या वेळीं मनुष्याचा सगळा अहंकार पार लोपून जातो. हा सोंसाट्यानें वाहणारा वारा जगन्नाथाचा श्वास असावा असें विचारी मनुष्याला वाटूं लागतें. मनुष्य कितीही नास्तिक असला तरी त्याची चपळ जीभ या चपलेपुढें कांहीं चालणार नाहीं आणि त्याची वायफळ वडवड मेघांच्या कडकडाटामुळें अगदीं लोपून जाते. ह्मणजे ईश्वराच्या अस्तित्वाचें हें प्रमाण दिसत असल्यामुळें त्याच्या वडवडण्याचा कोणावर कांहीं परिणाम होत नाहीं.

कवीच्या गंभीर प्रतिभाशक्तीचें हें फार मोठें उदाहरण आहे. झंझावात ह्मणजे ईश्वराचा श्वास ! अशा प्रकारच्या कल्पनेच्या भराऱ्या आमच्या इतर मराठी कवींच्या कृतींत कधींही दिसून येत नाहींत.

कवीच्या कल्पकतेचें मोठें प्रमाणभूत असें हें पावसाचें पुढील वर्णन पहा. मनोहर ह्मणतो:—

ही पहा कृष्णमेघरूपी राक्षसांची सेना विद्युद्रूपी राळेच्या प्रकाशांत आरो-

ल्या ठोकीत क्षितिजरूपी पडद्याच्या बाहेर सपाट्यानें पडत आहे. या भूमंडळ-रूपी कटाहास विद्युद्रूपी कथिलानें विश्वंभर कल्हई देत आहे असें वाटतें. विजेच्या प्रकाशांत क्षणभर हें जग कल्हई दिल्याप्रमाणें दिसून डोळे दिपून जातात. हे मेघसुद्धां तिजपासून होणाऱ्या धुराप्रमाणेंच दिसत आहेत.

जमले जलद पाहीं । निकषिं रेषा सुवर्णाची तैशी त्यांवरि चपळा ही ॥ ध्रु० ॥ चंद्रकळा जरिकांठा ताशि घनमाला चपला वाही ॥ १ ॥ चंद्रकलेशीं लोपवी जणुं खलनाशी निजजन मोहीं ॥ २ ॥

**पदांचा भावार्थ**—आकाशांत जमलेले हे काळे मेघ आणि त्यावर रेषे-सारखी चमकणारी वीज पाहून सोन्याची कसोटी पाहण्याचा पाषाण आणि त्यावर चकाकणारी सोन्याची रेषा यांची आठवण होते. त्याप्रमाणें काळ्या कुळकुळीत मेघांच्या भोंवतीं चमकणारी वीज चंद्रकळेच्या जरिकांठांप्रमाणें दिसत आहे.

या वर्णनांतील विचित्र व अभिनव कल्पना व रूपकें लक्ष्यांत घेतलीं म्हणजे मृच्छकटिकांतील शूद्रककृत पावसाच्या वर्णनाच्या तोडीस या वर्णनाला बसवा-वयास कोणती अडचण नाहीं असें वाटतें कल्हईची आणि सुवर्णरेषेची या दोन कल्पना तर एखाद्या महा कवीला शोभण्यालायक आहेत.

एकाच वृष्टिकालाचें आपण केलेलें गंभीर वर्णन आणि सरस्वतीनें केलेलें प्रेमळ वर्णन यांतील महदंतर पाहून मनोहर म्हणतोः—

तुझ्या आणि माझ्या कल्पनांत हें जें अंतर दिसून येतें त्याचें कारण माझी विधुरावस्था आणि तुझी विवाहित स्थिति हेंच होय.

बाह्य सृष्टि भासे । अंतरंग जैसें ॥ विषय एक भासे । भिन्न चित्तदोषें ॥ धृ० ॥ चित्त मुकुर नोहे कीं ज्यामाजि विषय बिंबे । उलट विषय दर्पण मन हें क्रांत ज्यांत खासें ॥ १ ॥

अर्थः—मनुष्याचें अतरंग जसें असेल त्याप्रमाणें त्याला सर्व पदार्थ दिसत असतात. स्वभावतः पाहण्याचा विषय एकच असतो; परंतु चित्तांतील विकारांप्रमाणें तो भिन्न भिन्न रूपानें दिसूं लागतो. मन हें कांहीं आरसा नाहीं कीं ज्यांत विषयाचें प्रतिबिंब पडून तो जसा असेल तसा दिसेल. उलट विषय हाच आरशाप्रमाणें असून त्यांत पाहणाऱ्याच्या मनाचें मात्र प्रतिबिंब दिसतें. ह्मणजे मनोविकाराला अनुसरूनच पदार्थ दिसतो.

एकच पदार्थ निरनिराळ्या मनुष्यांना निरनिराळ्या रूपानें कां दिसतो याचें कारण या पद्यांत दिलें आहे आणि आरशाच्या समर्पक आणि कविचातुर्यदर्शक रूपकानें तें सुबोध केलें आहे. सरस्वती प्रेमधनाचें वर्णन करितांना ह्मणतेः—

हें असे प्रणयधन इतर धनाहुनि मोठें ॥ जग मूल्य दिलें तरि मिळे न कवण्या वाटे ॥ कुणिं चोरियलें तरि खेद न धनिका वाटे ॥ आनंद मानसीं उलट तयाच्या दाटे । एकाहुनि अधिक न चोर तयाला भेटे । जरि भेटे तरि तें धन समजावें खोटें ॥ जरि फेड न झाली तरी दुणावें नेटें ॥ परि फेड झालिया मनीं उरे बहु कष्टें ॥

अर्थः—हें प्रेमरूपी धन इतर सर्व प्रकारच्या धनांपेक्षां फार मोठें आहे. सगळें जग किंमत ह्मणून दिलें तरीसुद्धां हें मिळण्यासारखें नाहीं. हें कोणी चोरिलें तर धनिकाला वाईट वाटत नाहीं. उलट त्याच्या मनाला मोठा आनंद होतो. या धनाला एकापेक्षां अधिक चोर नसायचे, जर असले तर तें प्रेमधन कुचकामाचें ह्मणून समजावें. याची फेड झाली नाहीं ह्मणजे हें जोरानें दुणावतें, परंतु जर फेड झाली तर मात्र मोठ्या कष्टांनें मनांतल्या मनांतच राहतें.

धनाहून प्रेम किती भिन्न प्रकारचें आहे हें यांत मोठ्या स्पष्ट आणि खुबीदार रीतीनें सांगितलें. क्रयविक्रयाच्या पद्धतीनें धन कोणत्याही पदार्थाच्या मोबदल्यांत

मिळूं शकतें; परंतु प्रेमधन सगळें जग दिलें तरी मिळण्यासारखें नाहीं. धन चोरीस गेलें तर धनिकाला–त्याच्या धन्याला–खेद होतो, पण हें प्रेमधन जर चोरीस गेलें–अर्थात् कोणावर प्रेम बसलें–तर त्याबद्दल कोणाला वाईट तर वाटत नाहींच; उलट आनंद होतो. या धनाला एकापेक्षां अधिक जण चोरूं शकत नाहींत. खरें प्रेम हमेष एकाच व्यक्तीच्या वांट्यास यावयाचें. ज्या प्रेमाला एकापेक्षां अधिक विषय असतील तें खोटें आहे असें समजावें. व्यवहारांत पहिल्यानें दिलेल्या धनाचीच जर फेड झाली नाहीं तर सावकार पुढें कर्ज देत नाहीं व व्यवहार पुढें बंद पडतो. पण या प्रेमधनाच्या व्यवहारांत जर प्रेमविषयक व्यक्तीनें प्रेमाची फेड केली–अर्थात् त्याचा स्वीकार केला नाहीं आणि तिरस्कारानें ज्याचें त्यांस परत दिलें–तर मात्र तें प्रेम मोठ्या कष्टानें मनांतल्या मनांतच राहतें; पण फेड झाली नाहीं तर मात्र तें दुप्पट होत असतें. याशिवाय हें पद साधेपणाच्या दृष्टीनेंही छान साधलें आहे. या नाटकांतील बहुतेक पदें इतर तीन नाटकांच्या पदाशीं तुलनात्मक दृष्टीनें पाहिलीं असतां पुष्कळ सोपीं झालीं आहेत.

आपण एकाद्यावर निष्कपट प्रेम ठेवीत गेलें ह्मणजे दुसराही आपणावर प्रेम करूं लागतो. या विधानाच्या समर्थनार्थ मनोहर ह्मणतो:–मनुष्यांमध्यें असें असतें यांत नवल नाहीं. पण निर्जीव सृष्टींतही हाच प्रकार दिसून येतो.

चंद्र दूरस्थहि पसरि निजकरांसी । दृढालिंगनं सागरा द्याव-
यासी ॥ गहनवृत्ति तदा अमधुरांतरात्मा । वीचिकर वरि
करि दावि निजप्रेमा ॥

अर्थः—फार दूर असणारा असा चंद्र समुद्राला दृढ आलिंगन देण्यासाठीं आपले हात पसरितो तेव्हां खोलवृत्तीचा आणि नीरस अंतरंगाचा समुद्रही आपल्या लाटांनीं चंद्राला आलिंगन देण्याचा प्रयत्न करून आपलें प्रेम व्यक्त करितो.

यांत दिलेला दृष्टांत नवीन असून समर्पक आहे. शिवाय दूरस्थ, गहनवृत्ति व अमधुरांतरात्मा हे श्लिष्ट शब्द आहेत. वृत्ति—वर्तन; जीवन ( पाणी )

मधुर—नीरस; अंतरात्मा—मन; ( लाक्षणिक अर्थानें ) जल. श्लिष्ट शब्दांचे अर्थ सहज लागण्याजोगे आहेत.

चंद्रिकेची गुप्त भेट घेण्यासाठीं तापसवेषानें आलेला चकोर तिचें चित्त आपणाकडे वेधून घेण्याकरितां एक गाणें ह्मणतोः—

भेटसि कां भिन्न अंगिं मजसि जानकि । सकलांगीं मिळशि कधीं मन अधीर कीं ॥ ध्रु० ॥ तुजसाठिं वनोपवनें हिंडलों फुका । सिंहीं कटि हरिणिं दृष्टि सर्पिं वेणिका । कोकिलिं चंपाकुसुमीं शब्द नासिका ॥ येत दिसुनि भुज लतांत । ऊरुहि कदलीवनांत । श्रांत दृष्टि करि पळांत । दर्शनें सुखी ॥ १ ॥ धुंडियलीं रम्य बहु सरें अनेक तीं । ओष्ठ विद्रुमांत कंठ शंखिं दीसती । कमलिं नेत्र उदकिं चित्त शुद्ध जें अति ॥ दुखती ऊरु भ्रमणीं । संवाही वरि बसुनी । अधरदानिं ने हरुनी ॥ शुष्कता मुखीं ॥ २ ॥

सीतेचा शोध करित असतांना शोकाकुल झालेल्या रामचंद्रानें हें म्हटलें आहे.

अर्थः—हे जानकि, आपल्या अंगशकलांनीं मला भेट कां देत आहेस ? सर्व अंगानें कधीं भेटशील सांग ? माझें मन फार अधीर झालें आहे. तुझ्यासाठीं वनोपवनांतून सारखा भटकत फिरलों; पण व्यर्थ ! ठिकठिकाणीं तुझ्या अंगाचे छिन्न भाग मात्र आढळून येतात. सिंहांच्या ठायीं तुझा कटिभाग, हरिणांच्या ठायीं नेत्र, सर्पशरीरांत वेणी, कोकिळेच्या ठिकाणीं आवाज, चांपेकळींत नासिका, लतांच्या ठायीं हात आणि कर्दळीच्या वनांत तुझे ऊरु दिसून येतात. याप्रमाणें तुझ्या देहाचीं भिन्न शकलें पाहून कष्टी झालेल्या माझ्या नेत्रांना आपलें दर्शन देऊन सुखी कर. अनेक सरोवरांतून तुझा शोध करितांही हेंच

आढळून येतें. पोंवळयांत तुझे ओंठ, शंखांत मान, कमलांत नेत्र, आणि पाण्यांत तुझें निर्मल चित्त हीं आढळतात. एकसारखा फिरत असल्यामुळें माझा अंकभाग श्रमित झाला आहे तर त्यावर वसून त्याचें संवाहन कर! आणि तोंडाला पडलेली कोरड अधरामृतानें नाहींशी कर.

शरीराच्या निरनिराळ्या अवयवांना कवी ज्या उपमा देत आले त्या सर्वांचा प्रकृत कवीनें येथें उपयोग करून घेऊन त्यांवर स्वतांचीही एक नवीन कल्पना बसविली आहे. यांप्रसंगीं या पद्यांतील विषयही मोठा योग्य पडला आहे.

चकोराची आपल्यासाठीं झालेली स्थिति पाहून चंद्रिका त्याला म्हणतेः—

दीन वेष दीनेकरितां घेतला वृथा हा। कां विडंबिलें इजसाठीं दिव्य अशा देहा ॥ धृ० ॥ स्कंधिं वसन भगवें राहे ती जिथें दुशाला। तिलक ज्या वसावा भालीं भस्म-पुंड्र त्याला। कंठिं ज्या असावी कंठी तेथ अक्षमाला॥ ग्रंथि झोळिची करिं जेथें ग्रंथ रहावा हा! ॥ १ ॥

अर्थः—या हतभागिनीसाठीं हा दीन वेष कशाला धारण केलात? इच्यासाठीं या दिव्य देहाची अशी विटंबना कां करून घेतली? हाय हाय! खांद्यावर ज्या ठिकाणीं उपरणें असावयाचें त्या ठिकाणीं भगवें वस्त्र आहे; कपाळीं जिथे गंधाचा तिलक असे तेथें भस्माचा पट्टा ओढला आहे; गळ्यांत जेथें कंठी असावयाची तेथें रुद्राक्षांची माळ आहे; आणि हातांत जेथें पुस्तकें असावयाचीं तेथें त्याऐवजीं झोळीची गांठ आहे!

या पद्यांत चकोराचें स्थित्यंतर फारच मार्मिकपणानें दाखविलें आहे. शेवटीं ग्रंथाबद्दल उल्लेख केला आहे त्यावरून कवीची सूक्ष्मावलोकनशक्ति दिसून येते. शिवाय या पद्यांत कवित्वप्रभाव व रसपोषही दिसून येतात.

विहाराचें व तरंगिणीचें भांडण झाल्यावर तरंगिणीला त्याबद्दल वाईट वाटेल म्हणून मनोहर म्हणतो—असें थोडेसें मधून मधून झालें नाहीं तर संसार मिळमिळीत वाटतो.

सुख न लागतें । प्रणय—कलह किरण-तिमिर मृदुल—परुष उष्ण—शीत जरि न नांदतें ॥ निजविरोधि वस्तुवीण । योग्यता न ये दिसून । अंतरिं नच वसत लवण । मधुर तरि न गमत अन्न । प्रेम तेविं तें ॥ १ ॥

प्रेम आणि कलह, उजेड आणि काळोख, मृदु पदार्थ आणि कठिण पदार्थ, उष्ण आणि शीत हीं जर नसतीं तर जगांत सुख ह्मणून मिळालें नसतें. विरुद्ध-गुणांच्या वस्तूवांचून कोणत्याही वस्तूची खरी योग्यता कळून येत नाहीं. मधुर अन्नाला जशी त्यांत थोडेसें मीठ नसलें तर रुचि येत नाहीं, तशीच प्रेमाची गोष्ट आहे. त्यालाही कलह लागतोच.

या पद्यांत मिठाविषयीं जी कल्पना दिली आहे ती जरी नवीन नसली तरी येथें फार समर्पक आहे, आणि तिच्या योगानें मनोहराच्या विधानाला बरीच पुष्टि येते.

आपला वाईट हेतु पूर्ण करण्याचा मनोहराला आग्रह करितांना सरस्वती ह्मणते-अशा एकांत स्थलीं व रात्रीच्या शांत वेळीं आपणांकडून जर थोडेंसें वाईट वर्तन झालें तर तें जगजाहिर थोडेंच होणार आहे ! हें पहा !

रात्रि पसरि निज वसन अवनिवरि ॥ स्वजनदुरित लपवुनि निज गहन तिमिरिं लाज वारि । प्रणतकरुण हृदय धरुन करुनि अवन दीन तारि ॥ धृ० ॥ कीटकरव कर्कशतम निर्मुनि रतिकृत निनद पूर्ण करित छन्न निमिषिं तूर्ण । प्रण-यिरतकलहशब्द बहुत मुग्ध नृपपरिचररतिं बुडवित निद्रित करि सृष्टि सारि ॥ १ ॥

सारांश:—रात्र आपल्याला शरण आलेल्या लोकांच्या सर्व प्रकारच्या कृत्यांवर पांघरुण घालण्यासाठीं गहन अंधकार निर्माण करिते आणि याप्रमाणें शरणाग-

तांचें रक्षण कारते. विलासी लोकांच्या प्रेमालापांचा ध्वनि रात्रीस ओर-डणाऱ्या किड्यांच्या ध्वनींत जातो; त्याचप्रमाणें प्रणयिजनांच्या कलहांचा आवाज राजसेवकांच्या ( गस्तवाल्या आरोळयामुळें कोणालाही ऐकूं येत नाही.

दुष्ट जनांच्या कृत्यांना रात्रीमुळें किती फायदा होतो हें या पद्यांत सांगितलें आहे. यांतील कल्पना अगदीं नवीन आहेत.

सरस्वतीची विनंति अमान्य करून मनोहर निघून गेल्यावर सरस्वती त्याला उद्देशून ह्मणतेः—

हृदय मम रमण हा नेत आकर्पुनी । जेविं चुंवक बळें आय-
सालागुनी ॥ धृ० ॥ प्रियलाभ जों कठिण । अनुरागिं तों लीन ।
वल्लभाविषयिं मन । होय मम या क्षणीं ॥ १ ॥ जलयंत्र-
जल वरुनि । रोधितां उद्गमनिं । गुणित हो वहु जवनिं । प्रणय-
गति तेविं जनिं ॥ २ ॥

अर्थ—ज्याप्रमाणें लोहचुंवक लोखंडाला आपणाकडे ओढून घेतो त्याप्रमाणें माझा प्रियकर माझ्या हृदयाला आकर्षून नेत आहे. प्रियाची प्राप्ति जों जों कठिण होत आहे तों तों माझें मन त्यांच्या प्रेमांत अधिकाधिक लीन होत आहे. कारंजांतील कोंडून ठेवलेलें पाणी जसें बाहेर निघावयासाठीं अतिशय जोरानें उसळूं लागतें, त्याप्रमाणेंच प्रेमाचीही गति आहे. त्यालाही कोंडून ठेवण्याची पाळी आली असतां तें आंतल्या आंत अतिशय जोरानें उसळ्या मारीत असतें.

यांत प्रेमाधीन मनुष्याची स्थिति फार चांगल्या रीतीनें वर्णिली आहे. तिरस्कृत प्रेम कमी न होतां उलट द्विगुणित होत असतें. यांत दिलेला कारंजाचा दृष्टांत फार समर्पक असून उत्तमही आहे.

स्त्रीविरहानें अमित्रासारखा झालेला विहार चकोरास ह्मणतो :—ज्यांनीं स्त्रीपुरुषांचा भेद दाखविला नाहीं अशीं शास्त्रेंच नाहींत;

स्त्रीपुरुषीं भेद दिसे । व्याकरणीं दिग्भासे ॥ स्त्रीनरकेसर ऐसे । ओषधिमधिं रज खासे ॥ वेदांतहि सुना प्रकृतिपुरुषां- वांचोनी । गणितीं चिन्हांकांसी । बघुनी होइ उदासी । विद्युन्मीमांसा तशि । स्त्रीनरभेदा लक्षी । यंत्रशास्त्रीं तोच येइ मळसूत्रीं दिसुनी ॥

अर्थ—व्याकरणांत स्त्रीलिंग आणि पुल्लिंग असा भेद केलेला आहे; वनस्पतिशास्त्रांत फुलांतील केसरांत स्त्रीकेसर आणि पुंकेसर असा भेद केला आहे; वेदांतांतही पुरुष आणि प्रकृति असा भेद आहेच! गणितांत चिन्ह, अंक हे भेद आहेत. विद्युच्छास्त्रांत ऋणविद्युत व धनविद्युत् याप्रमाणें स्त्रीपुरुषधर्मनिदर्शक भेद केला आहे. त्याचप्रमाणें यंत्रशास्त्रांत ( Mechanics ) मळसूत्रें हीं अशाप्रकारें भिन्न जातींचीं दाखविलीं आहेत. ( प्रवेशपरीक्षेच्या उमेदवारांना Male-screw आणि Female-screw हीं नांवें माहिती आहेतच. )

या पद्यांतील विधान अगदीं नवीन व मनोरंजक असून त्याच्या पुष्टीकरणार्थ दिलेले दाखलेही फार मौजेचे आहेत.

चकोर व चंद्रिका यांना एकमेकांचा विसर पडला हें ऐकून विहार ह्मणतोः- या जगांतील सर्वच मनुष्यें चंचलवृत्तीचीं आहेत असें दिसतें. पण त्यांनाच दोष कां लावावा ?

विश्व अखिल चल सदाहि । त्यातें न विराम कांहिं ॥ भ्रमण दिसे उडुसमूहिं । अविरत खळ त्यासि नाहिं । बहु चंचल अवनिगोल । नरदेहीं अणुहि चपल । तन्मतिसी काय नवल । दिसुनि जरी भ्रमण येइ ॥

अर्थः—हें सर्व विश्वच ( Universe ) सारखें फिरत आहे. त्याला कधीं स्थिरपणा ह्मणून माहितीच नाहीं. तारकागणही सारखा भ्रमण करित

असतो; त्याच्या फिरण्यालाही कधीं खळ पडत नाहीं. हा पृथ्वीचा गोलही अतिशय चंचल आहे; तोही मोठ्या वेगानें फिरत आहे. मनुष्याच्या देहांतील अणुरेणुहि सारखे भ्रमत असतात. असें जर आहे तर त्याची बुद्धिही जर भ्रमण करीत असेल तर त्यांत काय नवल आहे ?

या पद्यांतील सिद्धांतही अगदीं नवीन उदाहरणांनीं स्थापन केला आहे. ज्योतिःशास्त्रांतील सिद्धांतांचा कवीनें येथें जो उपयोग करून घेतला आहे त्यावरून त्याचें कल्पनाचातुर्य दिसून येत आहे.

बुरख्याच्या आड असलेलें मुख दाखविण्यास तरंगिणी तयार नाहीं असें पाहून विहार तिला ह्मणतोः–नुस्ता चेहरा बुरख्याच्या आंत लपवून हा कार्यभाग ( रूप न दाखविण्याचा ) कसा सिद्धीस जाणार ? वेलीचे कोमल पल्लव पाहून तिच्या पुष्पांविषयीं अनुकूल अनुमान काढणार नाहीं असा एक तरी मूर्ख जगांत दिसून येईल का ?

सुंदर वदन नसेल कसें । अवयव इतर जरी सुरुचिर हे
असती लावण्यें खचलेसे ।। ऐशी अवयवपंक्तिसमस्या ।
दिधली जरि रसिका उकलाया । पुरविल कल्पुनि मोहक
आस्या । संशय यांत न भासे ।।

हे इतर अवयव जर इतके सुंदर आहेत तर मग फक्त मुख सुंदर कसें नसेल ? अवयवरूपी ओळींची ही समस्या जर एखाद्या रसिकाला दिली तर तो एक सुंदर मुख ठेवूनच ती पूर्ण करील.

स्त्रिया एकवचनी व पुरुष चंचल असतात असें तरंगिणीनें ह्मटल्यावरून विहार ह्मणतोः—पुरुषांच्या स्थैर्याचे आणि बायकांच्या चंचलपणाचे नाहीं का दाखले देतां येणार ?

घन नभीं स्थिर असे पाहीं। चंचळा तडिल्लता परी सदाही ।।
तरु वसे सदा स्थिरदेही । हालते लता समीरहुंकृतींहि ।।

ध्रुव तसा अचलपदिं राही । तारका ताराश्रिता वि-
लोल मोहिं ॥

अर्थ उघड आहे. कल्पनेच्या दृष्टीनें हें पद चांगलें असून शिवाय मागें एकदां सांगितल्याप्रमाणें येथेंही चाल अर्थाला अनुरूप अशी पडली आहे. घन, तरु, वगैरेंचा स्थिरपणा दाखविणाऱ्या ओळी संथपणानें ह्मणावयाच्या असून लता वगैरेंचा चंचलपणा दाखविणाऱ्या ओळी जलद ह्मणावयाच्या आहेत.

याशिवाय सुख नरा मिळत; लग्न अह्मी लाविलें; हतदैव जिचें; माता करी प्रीति; सुखविति किति; श्रीकृष्ण तो परमात्मा; वेष योग्य हा; विनवि सुता; नको मज पीठ; जी तुह्मी असे गति; यापुढतीं रुचि; मम रोगमुक्ति नवजें; जिथें परमरुचि; नयन गेले खोल; चुंबुनियां त्यांसि हरिन; पदिं नमन तव शारदे; बहु चंचला खरी ही; पदिं याच गुंतुनी; हो मन शांत खरें प्रणयानें–हीं पदेंही उत्तमां-पैकीं आहेत.

नाटकाच्या शेवटीं सर्वजणांनीं स्वदेशाच्या कल्याणाकरितां ईश्वराची प्रार्थना केली आहे कीं:—

सुभगपण भरतभूप्रति वितरिं ईश्वरा ॥ ध्रु० ॥ स्वातंत्र्य
ह्मणुनि शिरिं । सौभाग्यतिलक धरि । क्रूर कालें स्वकरिं ।
पुशियला तो पुरा ॥ सूत्रिं मंगल जिचे । नृमणिमाला खचे ।
शून्यकंठा रुचे ॥ तुजसि तो पामरा ॥ भूतिकवरी विपुल ।
जाहली परि विरल । विखुरली अतिचपल । सांवरीं ती जरा ॥

अर्थ;--हे ईश्वरा ! भरतभूमीला सौभाग्य दे. स्वातंत्र्यरूपी सौभाग्याचा जो तिलक तिनें आपल्या कपाळाला लाविला होता तो क्रूर काळानें पुसून टाकिला आहे. जिचें मंगलसूत्र नानाप्रकारच्या नररत्नानीं खचून गेलेलें असे, तिच्या मंगलसूत्ररहित कंठाकडे पाहणें आज तुला आवडत आहे ! उन्नतिरूपी तिची पूर्वीची दाट वेणी आज अगदीं विरल आणि अस्ताव्यस्त झाली आहे; प्रभो, ती जरा सांवरून धर ! !

# समानार्थक स्थळें.

आतां इतर कवींच्या आणि रा. कोल्हटकरांच्या कृतींतील समानार्थक स्थळें ( Patallel Passages ) दाखविण्याचें राहिलें. हा भाग वाचण्याच्या दृष्टि दोन असूं शकतील. एका दृष्टीनें पाहणाराला हीं समानार्थक स्थळें निवळ कल्पनासादृश्यानें जमलीं आहेत असें वाटतें. स्वतंत्र शक्तीचा एक कवि दुसऱ्या कवींच्या कृतींचा फायदा स्वतःची कृति सजविण्यासाठीं घेईल असें या दृष्टीनें पाहणाराला वाटत नाहीं. दुसऱ्या दृष्टीनें पाहणाराला मात्र वाटत असतें कीं दोन कवींच्या कृतींत कोंठेंही साम्य दिसून आलें तर त्या दोघांपैकीं प्राक्कालीन असेल तो सभ्य व दुसरा चोर! ही दृष्टि सर्वथैव चुकीची आहे असें मात्र ह्मणतां यावयाचें नाहीं तिचा खरेपणा चोरीच्या आरोपांत सांपडलेल्या कवींच्या शक्तीवरून ठरत असतो. रा. कोल्हटकर हे इतक्या कमी शक्तीचे कवि आहेत असें त्यांच्या शत्रूलादेखील ह्मणतां येणार नाहीं. आणि असें ह्मणणारे जे लोक असतील त्यांनीं या समानार्थक स्थळांविषयीं वाटेल त्या रीतीनें विचार करावा. अशा लोकांची उलट समजूत करून देणें शक्य नाहीं व आवश्यकही नाहीं. रा. कोल्हटकर हे स्वतंत्र शक्तीचे कवि आहेत अशी खात्री असल्यामुळें हीं अर्थसादृश्याचीं स्थळें दिलीं आहेत.

वचकाला विलासाच्या कुशलावद्दल नंदिनीनें प्रश्न केला आहे:—

कुशलिं बहु नांदतो । नाथ माझा । विरहिं कीं पोळतो ।
नाथ माझा । अबलांचें सुकुमार जरी मन । संकटिं शांति
करी तरि धारण । पुरुषांचें परि होय विदारण । यासि
असे अपवाद तो ॥ नाथ माझा ॥

या पद्यांतील विचाराचें वॉशिंग्टन आयर्व्हिंग यांच्या "वाइफ" या निबंधांतील खालीं दिलेल्या विचाराशीं बरेंच साम्य आहे.

" जीं संकटें पुरुषांच्या धैर्याचा चुराडा करून त्यांना धुळीस मिळवितात

तीं येऊन पडलीं असतां स्त्रियांच्या अंगचें सर्व धैर्य एकवटून त्यांच्यावर त्या संकटांचा कांहींच परिणाम होत नाहीं. ”

सौदामिनी एके ठिकाणीं आपल्या आईबद्दल ह्मणते कीं, ‘ मी आपले डोळे या जगांत पहिल्याप्रथम उघडले आणि तिनें आपले अखेरचे लाविले. ’

डिकन्सचा डेव्हिड कॉपरफील्ड आपल्या बापाबद्दल ह्मणतो कीं, “ मी आपले डोळे पहिल्या वेळीं उघडले तेव्हां त्यानें आपले कायमचे मिटले. “

मूकनायकांत पुढील भाग आहे:—

रोहिणी–माझें हृदय आतां फुटावयाच्या वेतांत आलें आहे.

शरच्चंद्र—मग त्याला माझ्या हृदयाचा बांध घालायला उशीर करतां कामा नये.

लॉंगफेलो याच्या ‘ स्पॅनिश स्टूडंट ’ या नाटकांत पुढील संवाद आहे:–

नायिका—माझ्या हृदयाचे आतां तुकडे व्हावयाच्या वेतांत आले आहेत.

नायक--मग त्याला माझ्या हृदयाचा आधार जरूर दिला पाहिजे.

मूकनायकांतील प्रतोद विकंठाबद्दल ह्मणतो कीं:–इतकें असूनही त्याला आपला मूर्खपणा दाखविण्याची जी हातोटी साधली आहे ती विलक्षणच !

गोलियरच्या ‘ सर मार्टिन् मार ऑल् ’ नांवाच्या नाटकांत एक पात्र सर मार्टिनबद्दल ह्मणतें कीं, “ आपला मूर्खपणा प्रकट करण्याची त्याची शैली खरोखर अद्वितीय आहे ! ”

गुप्तमंजूष नाटकांत भृंगी ह्मणतो कीं, “ ज्या गोष्टीला उपाय ह्मणून नाहीं त्या गोष्टीसाठीं कितीही उपाय केले तरी ते निष्फळ होणार असें माझें ठाम मत आहे. ”

गोल्डस्मिथनें आपल्या “ चाइनीझ लेटर्स ” मध्यें एका पात्राकडून असें वदविलें आहे:–“ या संकटाला कोणताही उपाय करण्याची आशा नाहीं असें पाहून आह्मी मोठ्या धैर्यानें त्याला तोंड देण्याचा निश्चय केला. ”

मतिविकारांतील उताऱ्यांत दिलेलें “ स्थानें एका वस्तुसि ये भिन्ना महती ” हें पद खालीं दिलेल्या सुभाषिताशीं समानार्थक आहे :—

कीं वस्तु स्थळवैभवें करुनियां मोठेपणा पावती ।
नेपाळेश्वरभाळलग्नचिखला कस्तूरिका मानिती ॥

त्याच नाटकांतील "सुख न लाधतें" हें पद विक्रमोर्वशीयांतील खालीं दिलेल्या श्लोकाशीं कांहींसें समानार्थक आहे.

यदेवोपनतं दुःखात्सुखं तद्रसवत्तरम् ।
निर्वाणाय तरुच्छाया तप्तस्यहि विशेषतः ॥

मूकनायकांत वकिलानें धाकट्या कुमाराविषयीं ह्मटलें आहे,

मुखीं वीरश्री प्रकटवी महौजा । गमन उद्धत दर्शवि क्षात्रतेजा ।

उत्तररामचरितांत कुशाविषयीं राम ह्मणतो कीं,

धीरोद्धता नमयतीव गतिर्धरित्रीम् ।

मतिविकारांत सरस्वती मनोहरास ह्मणतेः—मला या काळीं (वृष्टिकाळीं) गंभीर विचार सुचण्याऐवजीं प्रेमाचे विचार मात्र सुचतात.

पदार्थमात्र करि या प्रेमोपदेश काळीं । परस्परीं प्रसक्ति घड-
वोनि विजयशाली ।

कालिदासाच्या मेघदूतांत यशीं समानार्थक एक चरण आहे तो असा--

मेघालोके भवति सुखिनोऽप्यन्यथावृत्ति चेतः ।

त्याच पावसाच्या वर्णनांत ह्मटलें आहे कीं,

चंद्रकळा जरिकाठां तशि घनमाला चपला वाही ॥

व विक्रमोर्वशीयांत त्याशीं समान कल्पनेचा एक चरण आहे:—

विद्युल्लेखाकनकरुचिरं श्रीवितानं नभः ।

येथेंच विजेविषयीं असें ह्मटलें आहे कीं,

निकषिं रेषा सुवर्णाची तैशी त्यांवरि चपला ही ॥

आणि विक्रमोर्वशीयांत असें ह्मटलें आहे कीं,

कनकनिकषस्निग्धा विद्युत् ।

तरंगिणीनें आपल्या दोघां भावांविषयीं ह्मटलें आहे कीं,

ते बंधु निश्चयी दोघे । झगडती संकटांसंगें ।........विपत्ति
गणुनि साहसशाला । आदरिती प्रेमें ते तिजला ॥

वॉल्टर स्कॉटच्या ' लेडि ऑफ् दि लेक ' या काव्यांत जेम्स एके ठिकाणीं निश्चयी वीरांविषयीं ह्मणतो कीं:--

To them.........
Danger's self is lure alone.

गुप्तमंजूषांत विलास वंचकाला ह्मणतो:--एकादी गोष्ट वरेच दिवस तुझ्या डोक्यांत घोळत राहिली ह्मणजे ती तुला खरी वाटूं लागतें.

डिकन्सचा डेव्हिड एके ठिकाणीं ह्मणतो कीं, " ही गोष्ट आह्मी इतके दिवस खरी मानीत आलों आहोंत कीं आतां ती आह्मांला खरोखर खरी वाटते."

मृच्छकटिकांत प्रतोदानें, " या सुरईंतील अमृत आह्मांला चाखायाला मिळेल तर बरें होईल" असें ह्मटल्यावरून विंकट ह्मणतो:—तुह्मी माझ्या हृदयांतील नेहमीं आहांतच. तेव्हां दारू माझ्या हृदयावाटें पोटांत जात जाईल त्या वेळीं तीं खुशाल प्राशन करीत जा !

विलियम् बार्नस् ऱ्होडस् याच्या ' बॉम्बॅस्टस् फ्युरिओसो ' या अप्रसिद्ध आणि छोटेखानी नाटकांत एक राजा आपल्या मित्रास ह्मणतो कीं :—

Thanks generous friends ! now list while I impart
How firm you're lock'd and bolted in my heart;
As long as this here pouch a pipe contains,
Or a full glass in that there bowl remains,
To you an equal portion shall belong.

---

# उपसंहार.



याप्रमाणें रा. कोल्हटकरांच्या नाटकांतील सुंदर पद्यमय उतारे यथामति दिले आहेत. त्यांच्या योगानें रा. कोल्हटकरांवर हल्लीं जो टीकांचा भडिमार होत आहे त्यानें लोकमतावर होत असलेल्या परिणामाचा उलट परिणाम -- मग तो किती कां थोडा असेना-- झाल्यास ते काढल्याचें सार्थक होणार आहे. रा. कोल्हटकरांची कृति सर्वश्रेष्ठ निर्दोष आहे असें कोणाहीं ह्मणतां येणार नाहीं. परंतु दोषसंख्या गुणसंख्येच्या पासंगासही पुरणार नाहीं. ज्यांत मुळींच दोष नाहींत असा एक तरी ग्रंथ सांपडेल कीं नाहीं, अशी शंका घेण्याचेंदेखील कारण नाहीं. प्रत्येक कृतींत दोष हे असावयाचेच. परंतु ग्रंथ तेवढ्यानें टाकाऊ होतो असांतला कांहीं प्रकार नाहीं. गोल्डस्मिथ ह्मणतो कीं, A book may be amusing with numerous errors, or it may be very dull without a single absurdity. त्याचप्रमाणें रा कोल्हटकरांची कृति सदोष असेल, परंतु तिची किंमत त्यांचे टीकाकार ठरवूं पाहत आहेत त्यापेक्षां मात्र शतपटीनें ज्यास्त आहे. असो. रा. कोल्हटकरांच्या नाटकांवर एक स्वतंत्र लेख वाचकांस प्रस्तुत लेखकाकडून लौकरच सादर करण्यांत येईल, असें अनपेक्षित आश्वासन देऊन प्रस्तुत विषय पुरा करितों.



Printed at S. M. Paranj...'s Manohar Press, Poona.

